श्री

# प्रकाशकाचा खुलासा

शिवकालीन पत्रव्यवहाराचा पंधरावा खंड १८३४ च्या श्रावणांत शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी यांच्या औदार्याने प्रसिद्ध झाल्यानंतर मराठ्याच्या इतिहासाच्या साधनांचे सोळावा, सतरावा, अठरावा व एकोणिसावा असे चार खंड इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झाले आहेत; त्यापैकीं पहिल्या तीन खंडांत शिवकालीन घराण्यांतील च पत्रव्यवहार आला आहे. प्रस्तुत खंडांत

| | | | |
|---|---|---|---|
| सुपे | ... देशपांडे | ... | पृष्ठांक १- ८२ |
| शिरवळ | ... देशपांडे | ... | ... ८३-११४ |
| वांई | ... चित्राव | ... | ... ११५-२५६ |
| उंबरज | ... जाधव | ... | ... २५७-२७४ |
| कोल्हापुर | ... धर्माधिकारी | ... | ... २७५-२८६ |
| कल्याण | ... जोशी | ... | ... २८७-३१२ |
| पंढरपूर | ... आराध्ये | ... | ... ३१३-३२८ |
| मोरेश्वर | ... इनामदार भगत | ... | ... ३२९-३६२ |
| पुणतांबे | ... जोसी | ... | ... ३६३-३७४ |
| भोर सांगवी | ... निंबकर | ... | ... ३७५-३८० |
| मंगळवेढें | ... | ... | ... ३८१-३८४ |
| अक्षी | ... पाटिल | ... | ... ३८५-३८८ |
| मालवण | ... | ... | ... ३८९-३९२ |
| सिंहगड | ... कोळी | ... | ... ३९३-३९६ |
| फलटण | ... | ... | ... ३९७-४०२ |
| किरकोळ | ... | ... | ... ४०३-४३६ |

इतक्या शिवकालीन घराण्यांचा पत्रव्यवहार आला आहे. जों जो प्रयत्न करावा तों तों आणखी महत्त्वाचा शिवकालीन पत्रव्यवहार उपलब्ध होत आहे, हें पाहून असें वाटूं लागतें की या पत्रव्यवहाराला अंत च नसावा! तथापि आणखी एका खंडापुरता पत्रव्यवहार उपलब्ध झालेला आहे, तो पुढील वर्षापर्यंत प्रसि

झाल्यावर एकदर शिवकालीन देशस्थितीचें विवेचन करण्याचा इतिहाससंशोधक विश्वनाथपंत राजवाडे यांचा विचार आहे

प्रस्तुत खंडांत आलेल्या सर्व व्यक्तींची व स्थळांची सूची शेवटीं दिली आहे, ती अत्यन्त उपयोगी आहे हें सांगणें नको व कोणता हि ग्रन्थ व त्यांतल्या त्यांत इतिहासाचा ग्रन्थ सूचीवांचून प्रसिद्ध करणें गैर होय वाचकांची अशी गैरसोय यापुढें तरी करूं नये, असा मंडळाचा हेतु आहे आतांपर्यंत मराठींत जे जे इतिहासग्रन्थ प्रसिद्ध झाले आहेत त्या ग्रन्थांची बृहत्सूची तयार करण्याचें काम मंडळानें अंगावर घेतलें आहे रा राजवाड्यांच्या खंडांतील सर्व खंडांची सूची तयार झाली असून, यापुढें रा ब साने, रा खरे, रा ब पारसनीस वगैरे ह्यांच्या ग्रन्थांची सूची क्रमशः होणार आहे ही बृहत् सूची म्हणजे च दीड दोन हजार पृष्ठांचा ग्रन्थ होणार आहे, पण तो अत्यन्त आवश्यक आहे तदभावीं इतिहासाचें अध्ययन व्हावें तसें होत नाहीं व होणार नाहीं या कामीं वास्तविक आस्थेवाईक श्रीमंतांनीं मंडळास साहाय्य केलें पाहिजे असें वाटतें

वर्षप्रतिपदा १८३० }<br>
भा इ सं मंडळ कार्यालय-पुणें }

चिटणीस



# मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें



## खंड २० वा



लेखांक १ — १३५० सुमार

( वरील १४ ओळी गहाळ झाल्या आहेत. ) *

ओळ

| | | |
|---|---|---|
| १ | से ‖ २ ‖ व टके ५००० पाच देण | ( १५ ) |
| २ | या बोला अन्यथा नाही हद | ( १६ ) |
| ३ | महदूद वरीलीकडुनु तरवडादेवी | ( १७ ) |
| ४ | चा त्रीशुळ वीवंधा पींशावा चि | ( १८ ) |
| ५ | चवालि व वढाणे तेथुनु उत्तरे | ( १९ ) |
| ६ | स वरीले राजोरीची बाट तेथुनु ही ध | ( २० ) |
| ७ | रण पाढरफळीचा खीळा तेथुनु तीवधा | ( २१ ) |
| ८ | चिचवलि सुपे वढाणे हा तिवधा ते | ( २२ ) |
| ९ | थुनु बळूहे टेक तळयाची पाळी तेथु | ( २३ ) |

---

* हें वाटपपत्र आहे. त्याच्या पहिल्या १४ ओळी गहाळ झाल्या आहेत. त्यांत वांटणीचा तपसील होता. अर्थात् नामें, विशेषणें, व क्रियापदें याची जुनी रूपें त्यांत सांपडती. उपलब्ध ओळींतील भाषेवरून असें दिसतें कीं हें पत्र शक १३०० च्या पुढलें व १५०० च्या मागले आहे. **तळयाची** ह्या रूपावरून दिसतें कीं हा लेख ज्ञानेश्वरानंतरचा आहे. ज्ञानेश्वरकाली **तळेयाची** असें रूप होई. तेथुनु वगैरे रूपांवरून दिसतें कीं लेख एकनाथाच्या पूर्वीचा आहे-तेथुनि, तेथुनिया, असें रूप एकदा हि आलें नाहीं. हदमहदूद हा एक च शब्द अरबी आहे त्यावरून दिसतें कीं हा लेख मुसलमानी अंमल झाल्यापासून सुमारें शंभर दीडशे वर्षांच्या आत लिहिला गेला असावा. मुसुलमानी अंमल शक १२३९ त महाराष्ट्रात सुरू झाला.

१० नु साईश्वर तेथुनु घाटोली टेमि (२४)
११ + + क देउळगावीची वाट तेथुनु (२५)
१२ विवषा पश्मी वढाणे सुपे हे मिया (२६)
१३ व तुषा साईमे या बोला अन्यथा (२७)
१४ नाही ओळी ॥ २८ ॥ अठावीस (२८)

( फारसी दोन ओळी )

+ + + षा जमषाद से॥ क॥ सुपे
वीठ पाटील कमळ पाटील से॥ अमनुस पा॥ सीरवळ
हरि म्पाटील मार्या पाटील मौजे पारखेल पा॥ सुपे
+ + (मा) यो भडबो हवीकार मौजे राक्षीन
गणो दसगो मौजे पीपरी पा॥ सुपे
सुको चागो हवीकार मौजे घीसले पा॥ + +

मळनाक षायनाक
नाग जोसी कुळकर्णी सुपे
मेहतरी घामु क + + मेहतरी अव घळा सुपे
आईदे पाटील अंगद पाटील अमनुस पा॥ सीरवळ
मीळो बाको द + र मौजे साव गाऊ पुणे
गोदो कान्हो मौजे कोपरूळ पा॥ पुणे
माळो मार्या मौजे सुपे पा॥ चंदवेदी

---

लेखांक २ १३७० कार्तिक शुद्ध ७

ताळीक

इकौलनों अज रस्तखाने खुदायर्वद मलिक अममअल अकरम मलिक सुजार हवालदार मंदरगे मुन मुस्तफाबाद व षाजे माहाल समत सुनर व पा॥ चाकण व पुणा व पा॥ सुपे व सीरवळ व बारामती व + + + +बिजानेबु कुमाजी केबाजी देसमुख म षाजे नि॥ देसाई व मोकदमानि व सेटिये व माहाजना नि व रयानि व नफर साकिनानि पा॥ सुपासीरवळ बिदानद सु॥ इहिदे समसीन व समान मया षाये कौलनामा ऐसा जे तुमचे षाये जनाषाही अर्लप नाह कासी हवीब अम औलादी हजरती काजी मनयूर आरीबु मालूम केले जे विलायती येरे पहिली + + + + + + + + कौल मन्दामती + +

+ + + + + + + + + + मालुमाती खातिरेसी आणौउनु रेवाज बाला कौल सादर असे सुर्खे कीर्दी मामूर बेमुरवत होऊन करणे मोर्तब

तेरीख ५

रमजानु

---

लेखांक ३ १४९२ आश्विन वद्य-१२




अज रख्तखाने खुदावंद खाने अलीशान खान अजम सलाबतखान खुली-दामदौलतहू बजानेबु देसमुखानि व देशपांडियानि व मुकदमानि प्र॥ सुपा बिदानद सु॥ सन इहिदे सबैन व तिसा मया मालूमात दर्‍ी विला मुला दाउद खिजमतगार कसबे मजकूर जाहीर केले जे आपणासी इनाम जमीन चावर २ दर सवाद क॥ म॥ कुतवल वाहाती नीम चावर कदीम पुरातन आहे दुमाले कीजे अवलाद व अफलाद चालविजे छ २५ माहे जमादिलावल

---

लेखांक ४ १५४४ वैशाख शुद्ध ५

सिधेश्वरु *

श्री सके १५४४ रुधीरोद्गारी सवत्छरे वैषाख सुदी पचमी शुक्रवार ते दीसी राजश्री बाबदेभट जोसी धर्मादीकारणी कसबे सुपे यासि सीतोजी गोलाडा अंतोजी गोलडा लीहुन दीधले ऐसे जे आपण बहुत दुकळाकरीता तुटलो तरी आपणास खावयासी नाही आपला जीउ राखीला पाहीजे ह्मणउनु तुह्मास आपली खुसीने आपला घरवाडा नजीक पार चीरेबदी बैसकी केसो

---

* हा सबंध लेख बाळबोधींत लिहिला आहे व येथें ऱ्हस्वदीर्घ जशाचा तसा दिला आहे. त्यावरून तत्कालीन रूपें कळून येतील.

+ + कुस पुर्व आमेसी आकारा व दक्षणेकडे हीरवे माली यो जागा आपला यो तुमास मीकत दीधला असे तुमापासुन आपण घेतले होन अशीवा व गाडा जोरी वायेती दौलत मगळमेरी मण टके ८१॥ साडे तीन दर मणे टके ८ नीप व मात मण टके ८१॥ दीढ दर मणे टके ४॥। पावणे पाच एकुण टके व पासोडी अथ जुनी येक ऐसे घेउन याचा व मरठाण तुमास दीधले असे आपला कोणी गोतीचा उभा राहील त्यास गाली असे आपण दुकळात भीड माचायाया अनांकारणे आतमसुखीने दीधला असे तुसी खुसी घरयाडा बाधणे सुखे असणे हे लीहीले सही

गोही

| | |
|---|---|
| गोमाजी बीन कुमाजी | आकोजी गोळाद |
| माहाजन क॥ सुपे | क॥ म॥ |
| जात माली योवीमळकर | याळ माळी यारखकर |
| | हे रतनोज्या गु॥ दिघले |

---

लेखांक ५ १५४९ श्रावण

अज रख्तखाने खान फतादखान खुलीदौलवहू ता॥ माहादो खसमदेउ देस






कुळकर्णी प॥ सुपा बिदानद सु॥ सन समान इ॥ अलफ अदास व २२ जिल्कादी व ७४ माहे जिम्देज मजमून की हुजरू पटीचा माही मस्ता केला ते येरीजची पटी करुनु तहसील लाविली आहे माहाली दस्त कारी कागदपत्र नाही याबदल नजर माजनापरी केली आहे तहसील हो सो जे गाव मडुत लावणीस होतील तेथे दाहा पोच होनु लोटी करुनु दिलासा करुनु मरकड उगवणी करुनु घेतली पाहिजे म्हणौउनु लिहिले तरी पटीचा झाडा सीताबीने होद पेस्तर साळमजकूर नस्याची बाली लागे ऐसे करणे दिवाणकामासी तकसीर न करणे म रातीदिवस साहेबकामासेरीज दुसरें काम करीत नाही साहेबाचा पटफमा आहे तेणे प्रमाणे वर्तणूक करीतो म्हणौउनु लिहिलें तरी जे काही साहेबकामगारी कराल ते तुमचा पायदा आहे व माहाली मजमुदार कागदपत्र पुसताति

माहाली कागद नाहीत कमाविसेचे काम चालिले पाहिजे तरी साहेबी नजर इनायती फर्माउनु आपला बिराजर हरिपत व कागद माहालास पाटविले पाहिजेत साहेब मायेबाप आहेती ह्मणौउनु लिहिले तरी नरहरी बिराजर त्याचे कागद पाहाणे बहुतेक जाहाले आहे लवकरी च माहालासी रवाना होईल व साल गु॥ लागवण जाले होते आजि पडि मुतलख होणे त्यास कौल देउनु जैसे लागवण होते तैसे लागवण करवितो पेस्तर लागवण जालियां हर कैसी कमावीस साहेल तैसी केली जाईल पारि लागवण जाले पाहिजे गैरहंगाम आहे पारि लागवण करावयाचे ततबीर करितो तकसीर करीत नाही ह्मणौउनु लिहिले तरी जे काही दौलतखाही कराल तैसा नतीजा आहडेल मोर्तबू



---

लेखांक ६ १५५१ वैशाख शुद्ध ३




+ + + + + खुदायवंद मालिक से॥ मलिक अंबर खुलीदयामदौलतहू बजानेबू कारकुनानि हाल व इस्तकबाल व देशमुखानि प॥ सुपे बिदानद सुहुरसन तिसा असरीन अलफ शरफअली हेजीब बजारतमाब खान अजम याकूदखान मालूम केले जे माहादो लखमदेऊ देसकुलकर्णी प॥ मजकूर याच्या बडियाने थरेदी ठेविला होता त्याणे सळासिरी करुनु यासि हकलाजिमा नेदी मग नफरमजकुराचा बाप लखमोवा खाने अजम दस्तुरखानास मालूम करुनु त्यास सजा देउनु बाहेर घालविला नफरमजकुरास खुर्द खत करुनु दिघले हाली थरेदीमजकूराचा फर्जंद कोतोवा खानाचे बदगीस उभा राहिला आहे मग माहादो लखमदेऊ देसकुलकर्णी तलब करून आणउनु मुनसफी करिता

कोवीबा खोटा जाला माहादो छलमदेऊ देसकुलकर्णी मदगीस आणला असे खातिरेस आणउनु सुर्द खत वाचया रवा होए मालूम केले तरी देसकुल कर्णीमजकुराची हकीकत खातिरेस + + + + + खाने अमम दस्तुरखानाचे सुर्द खत पाहोन कोवोबा + + + + + + + उनु बाहेर धावला माहादो छलमदेऊ देसकुलकर्णी + + + + + र यासि माहालास पाठविले असे समाम + + + + + + यासि माहाली महजर करुनु देणे पेस्तर + + कोण्ही उमा राहिला तरी ताकीद फर्माविणे ताळीक लेहुनु घेउनु असल देसकुलकर्णीमजकुरापासी परतोनु दीजे मोर्तबु



वेरील १ माहे रमजानु

रमजानु

---

लेखांक ७ १५५८

इनामती कृस्णभट बिन हिरण्यभट व रुद्रभट बिन रघुनाथभट
कृस्णभट बिन हिरण्यभट मालूम
केले जे आपणास इनाम दर सवाद
का॥ म॥

| | | |
|---|---|---|
| जमीन चावर एक | | म॥ खुर्द खते मजिरानि |
| दर सवाद का॥ म॥ | | याकुबखान एदिलशाही |
| देखील नख्तयाती | | याचे नावे खुर्द खत लिहिले |
| भुलबाब कुलकानू | | असे |
| व वेठीबेगारी | खानमुधद | खानदस्तूरखान |
| फर्मान गजबरायनी | खान मु॥ | मु॥ समान समानीन |
| प्रज बाको बोरीकर | सीत समानीन | छ १ जमादिलाखर |
| फर्मान छ ७ खिल्देन | व तिसा मया | |
| समान अलफ | छ २९ जमा | |
| | दिलाखर | |

जकाती माहाल हासील व थावर
पैकी सालीन्या टके तीस
३०

| | |
|---|---|
| पथक सौताळू | पथक प० |
| टके ५ | टके ५ |
| पाटस | खडकी |
| टके ५ | टके ५ |
| पथक सासवड | पथक सिरसोफळ |
| टके ५ | टके ५ |

यासी भोगवटे

| | |
|---|---|
| याकूदखान | फरादखान |
| १ | १ |
| माहाराजसाहेब | शरावणखान |
| १ | १ |
| साटा | खेळोजी राजे |
| १ | १ |
| + + + + | खेळोजी राजे |
| १ | १ |
| अळीखान | माहाराजसाहेब |
| १ | १ |
| मंबाजी राजे | असतखान |
| १ | १ |
| महाराजसाहेब | साळसबा माहाराजसाहेब |
| १ | १ |

रुद्रभट बिन रघुनाथभट चावर मौजे आंबी खुर्द प्रज असर पाटील चौगला चावर १

सालाबाद भोगवटे खुर्द खते
कारकीर्दी मलिक अंबर

| | |
|---|---|
| याकूदखान | फरादखान |
| १ | १ |

२

| | |
|---|---|
| सेळोजीराजे | मबाजीराजे |
| २ | १ |
| नारायणखान | हैबतखान |
| १ | १ |
| माहाराजसाहेब | भवतखान |
| १ | १ |
| सुभेजी साठिया | माहाराजसाहेब पेसजी |
| १ | १ |

\+ + + + + +

हाळीसाल सु॥

माहाराजसाहेब

१

---

लेखांक ८

श्री

राजश्री त्रिंबकपंत

गोसावी यास

अखंडितलक्ष्मीप्रसन्न महामेरु राजमान्य राजश्री सेवक भवानी दत्तो अजहत सामराज फाटे देसमुख प॥ सुपे नमस्कार विनंति उपरि संभाजी मोहिता रामाजी बाबाजीच्या गळा पडिला आहे की विठलसेटीच्या गुमास तीने पंचवीस होन देणे यास रामाजी बाबाजी म्हणताति की संभाजी मोहिता यास होन पंचवीस उसणे दिधले होते याचे कलान्तर देसील होन २७ गुजारती त्रिंबक विश्वनाथ सदरहू पैके दिधलेयावरी येऊ लागलियावरी माग ता सुमार पंचवीस होन साधिले ते येळेस आपणास पैके न मिळती व मग विठलसेटी सेटियाचे गुजारतीने त्यापासुनु मागता फज फाडाहुनु होन २५

दिधले ते त्याने वळखिले की हे पैके आपलेच की हे हि संभाजी बोलिला तरी सदरहू हकीकती कैसी आहे ते आपले पूर्वज स्मरोनु लेहुनु पाठवणे हे विनति




हे विनति

---

लेखांक ९ १५६१ ज्येष्ठानंतर

तालीक

अज रखतखाने राजश्री शाहाजी राजे दामदौलतहू बजानेब कारकुनानि हाल व इस्तकबाल व देसमुखानि कर्याति बारामती बिदानद सु॥ अर्बैन अलफ दरवज बदल इनाम धर्मोजी काटे देसमुख कर्याती मजकूर जमीन चावर ४ च्यारी बितपसील

दर सवाद कसबे बारामती चावर दोनी २ दर सवाद मौजे मलेद चावर एक १

दर सवाद मौजे रुई चावर एक १ लग ०

देखील नख्तयावां महसूलबाब व कुलकानू अजरामऱ्हामती आले असे दुमाले करणे तालीक घेऊन असेल इनामदारास परतोन देणे दर हर साल खुर्द खताचा उजूर न कीजे मोर्तब *

---

* इतर बहुतेक सर्व नकलाप्रमाणें ही हि नकल भाषेतील रूपासंबंधानें आधुनिकीकृत आहे.

लेखांक १०　　　　१५६८ अधिक श्रावण

श्री

सालीक




अज रख्तखाने राजश्री सीवाजी राज दामदौलतहू बजानीब हुदेदारानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि मौजे लोणी तारकर्डियाची प॥ सुपे बिदानद की सु॥ सन सबा सबैन अलफ दरीं विळे मोरेस्वर गोसावी सेकीन मोरेस्वर हुजूर एऊन इलतिमास केली जे आपणास इनाम व॥ फर्मान हुमायूनु व व॥ खुर्द खत वजिरानि दर सवाद मौजेमजकुरी चावर गजराज-पनी १ प्रज एसू मोगवटा व तसरुफाती चालिली आहे ए बाबे पेशजी आपण हुजूर एऊन अर्ज केला की मोगवटियाची खुर्द खते आपणापासून फितरतीमध्ये गेली आहेती साल गु॥ सन सीता कारणे मौजेमजकूर साहेबास अर्जानी आला म्हणुन हुदेदार ताजिया खुर्द खताचा उजूर करिताति म्हणुन अर्ज केलियावर हुजरून हुमाळे खुर्द खत सादर आले ते मौजे मजकुरास घेऊन गेलो माहालीचे हुदेदार उजूर करिताति की खुर्द खत लिहिले आहे की मोगवटे व तसरुफाती चालिली असेली तेणेप्रमाणे हुमाळे करणे यावरून मोगवटियाची खुर्द खते पाहिजेत म्हणून उजूर करिताति तरी दरीं बाब याबबदल पेशजी अर्ज केला आहे की मोगवटियाची खुर्द खतें फितरती मध्ये आपणापासून गेली आहेत ए बाबे हाली मौजेमजकूरचे मोकदमी अर्जदास्त लिहिली आहे एखियास नमर पनापत फर्मोउनु हुदेदार उजूर न करिति ऐसे हुमाले खुर्द खत देविले पाहिजे म्हणून मालूम केले तरी मोरेस्वर गोसावी से॥ मोरेस्वर यास इनाम बाबत मुलखानी एक प्रज एसू देसीक महसूल नख्तयाव व तमाम लवाजिमे व वेठीबेगारी व फर्मायसी व वेठेकटी व + + पटी व पायपोसी व मेजवानी व मोहीमपटी व सर्वपटी व वेलपटी व कानूं व कदीम व जदीद व तूप व फळकी व वादिखार व

इकलवाजिमे देसाई व सेटे व बाजे कुलबाब कुलकानू नकदी व ऐनजीनसी दुमाले करणे व सदरहू प्रजेचे सेत हाली मोजून हदमहदूद घालून देणे व नख्त + + + + + + कुल दुमालियावरी + + + लागले ढेपेच्या हिसेबाने बसेले ते व गला कमाविसेने एत जाईल तो एणेप्रो वाराचीवार दुमाले करणे दरहर साल ताजिया खुर्द खताचा उजूर न करणे तालीक घेऊन असल पत्र + + + दरमियाने भोगवटा व तसरुफाती + + + + + + + याचा उजूर न करणे मोर्तब सूद

रुजू सुरुनिवीस

सुरु सूद

+ + + + जमादिलाखर

---

लेखांक ११ १५६८ आश्विन शुद्ध २







अज दिवाण ठाणे पा। सुपे ता।——

देसमुखानि पा। म।   मोकदमानि मौजे + + + मजकूर सु। सबा अर्बैन अलफ ता। बापदेभट बिन लक्ष्मीधरभट जोसी क। म। इळतमेसी केली जे मगळमूर्ती गोसावी सौ मोरेस्वर याचि इनाम जमीन चावर व सालीना होन ५ पाच आहे दर सवाद बित।

| | |
|---|---|
| जमीन चावर एक दर | सालीना सादिलवार |
| सवाद मौजे आंबी बु। | नि। रयां पा। म। |
| कुलबाब कुलकानू पटिया | देसमुखी पा। समधे |
| सहित चावर गजशराइणी | घ्यावे होनु ५ |
| प्र। चावर १ | |

पणेप्रमाणे आहे याचे भोगवटेचे कागदपत्र कुल आदेव गोसावी आणि आपण गुरुभाऊ यानिमित गोसावी वाराणसीस जाता सदरहू इनामती कागदपत्रसहित यमार्तवुधी देउनु आपण वाराणसीस गेले तरी आपणासी सदरहू इनामचे मिरासी पाहिजे म्हणउनु बमानवार मालूम केले तरी वराये मालूमाती खातीरेसी आणउनु सदरहू इनामती गोसावियांनी जोसियासि दिधले सही खातीरेसी आणउनु इनामती जोसीमाचे दुबाळा केले असे दुवाळा कीजे ताकीद घेउनु असेली परतोनु दीजे

तेरीख १ रमजान

माहे रमजान

फारसी अक्षरें

---

लेखांक १७ १५७१ पौष शुद्ध १२

अज रख्तखाने माहाराज राजश्री शाहाजी राजे दामदौलतहू बजानिबु कारकुनानि प्र॥ सुपे चिदानद सु॥ समर्हेन अलफ माल मेहसरिया चांभार प्र॥ मजकुर हजूर एऊनु मालूम केले जे प्र॥ मजकुरीच्या चांभारास गहदम सालाबाद सारा मेणे तो ऐन जिनस पायपोसी च घेत असेती नख्त काही आपण देत नवो ऐसे असता आपणापासुनु ऐन जिनस जोडे घेत नाहीत दर जोडियास टके १॥। प्रमाणे नख्त घेताति याकरिता आपला काही हाल उरला नाही तरी साहेबी मेहरबान होऊनु सालाबाद प्रमाणे आपणापासूनु ऐन जिनस जोडे च घेतले पाहिजेसी नख्ताची फर्मायीस कुली दूरी च केली पाहिजे प्र॥ मजकूर देसीस क॥ बारामतीचे कुल चांभार आपल्या हातासाले चालेत ऐसे केलिया आपण होनु ७५ पंच्याहात्तर आपल्या हकछाजिमियापैकी साहेबाचे मांदगीस पेशकश करून यास साल मजकुरी होनु ५० पनास हासा करून देईन पुढिले साली होनु २५ पंचवीस पणेप्रमाणे हासा करून देऊनु दरीबाम सरजाम होए मालूम जाले तरी नख्ताची फर्मायीस साहेबी कुली दूरी च केली असे पा॥ मजकुरीचा चामारापासूनु नख्त एक रुका ने घणे सालाबादप्रमाणे ऐन जिनस पाय पोसाचे जोड च मजपासूनु घेत जाणे ऐन जिनस जोडे राजपासूनु घेऊनु मुकासाईयास देत जाणे आणि मुकासाइयाच्या आमिया लाले दर जोडीस

टके १॥. प्रा। नख्त लिहीत जाणे कुल चांभारापासून एक रुका तो हि नख्त ने घणे व पा। मजकूर देखील बारामती कुल विलायतीच्या चांभारास ताकीद करून माल मेहतरियाच्या हाता खाले वर्तवीत जाणे हिलाहरकत करील त्यास वरजोर ताकीद करीत जाणे व याची कबुलाती सदरहू होनु ७५ पच्याहात्तरी यास सालमजकुरी उसूल करूनु घेणे होनु ५० पनास व पुढिले साली घेणे होनु २५ पचवीस एणेप्रमाणे दुसाला रुकियाचा रुका झाडा करून घेणे दर हर साल ताजे सनदेचा उजूर न करणे तुही तालीक लेहोनु घेऊनु असल परतोन दीजे पा। हुजूर रा। शाहा अजम हैदरशाहा मोर्तब सुद



छ १० माहे मोहरम

रुजू सुरुनिवीस

---

लेखांक १३ १५७३ चैत्र शुद्ध ७




अज रखतखाने माहाराज राजश्री शाहाजी राजे दामदौलतहू बजानेब कारकुनानि हाल व इस्तकबाल व देसमुखानि पा। सुपे बिदानद सु॥ इहिदे खमसैन अलफ बे॥ लक्ष्मीधरभट बिन जाऊभट जोसी कसबे मजकूर हुजूर एउनु मालूम केले जे आपणास इनाम व रोजमरा बितपसील



| | | |
|---|---|---|
| दर सवाद का॥ मजकूर | | अकादी चौथा का॥ मा॥ |
| बागबागायत | चावर एक दे॥ | पैकी रोजमरा दरोज |
| कदुवान टके | नख्लयाती वा॥ | रुके था ५६ |
| १५ पैवस्त | ठाणे व वा॥ देहाय | |
| विष्णु हरदेऊ | कुलबाब कुलकानु | |
| कुळकर्णी | प्रज जाऊ पो॥ | |
| अंबराईपैकी एक | विन नरस पा॥ | |
| १ | मोहवा | |

एणेप्रो बा॥ फर्मान व बा॥ भोगवटे वजिरानि व बा॥ खु॥ रा॥ ह॥ वा॥ साल गु॥ भोगवटा व सवदफाती चालत आले आहे ऐसीयास प्रांतमजकुरी कुल इनाम अमानत करणे म्हणौनु माहालास एकंदर खुर्द खत सादर आहे त्या वरून फारकुनी आपला इनाम अमानत केला आहे तरी साहेबी मेहेरबान होउनु आपला इनाम आपले हुमाले केला पाहिजे दरी बाब खुर्द खत होए मालूम जाले तरी मटमजकूर हुजूर आला होता माझ्या इनामाची कुल हकीकत हुजूर मनास आणौनु सदरहू इनाम पैकी अमानत केले बागबागायत कदुवान व अंबा पैंड एक व जमीन चावर ॥ नीम व रोजमरा रुके ५४ च्यारी एणेप्रमाणे अमानत केले असे हे + + + + बाकी मटम जकुरास इनाम करार

| | |
|---|---|
| रोजकीर्दीपैकी चावर नीम | रोजमरा दर सवाद अकादी |
| ०॥० | चौथा का॥ मा॥ पैकी रुके च्यारि |
| १ | ५४ |

+ + + + + व प्रज व बावेहाय

सदरहू प्र॥

एणेप्रमाणे करार केले असे सदरहूप्रमाणें चालवीजे दरहर साल ताजे खुर्द खताचा उजूर न करणे तालीक लेहोनु घेउनु असेली मटमजकूरासी फिरउनु देणे + + + + जेमाखान पीरजादे मे सेव यद

रा॥ छ ६ माहे रबिलासर
रबिलासर



लेखांक १४ १५८०

पा। सुपे

ता। हकीम

भाडे

अमदानगरास

| | |
|---|---|
| जोडीच्या बैलास | वाजे जिनसास |
| दर एकास होनु | दर बैलास |
| .।।ॽ | प्रताप .।।' |

दौलताबाजेस याकूदखान

| | |
|---|---|
| जोडीच्या बैलास | वाजे जिनसाच्या |
| होनु १।' | बैलास होनु |
| | १॰ |

वकरकसाब

| | | |
|---|---|---|
| खा। सकताना | खा। मेसी दर | |
| दर एकास रुके | एकास रुके | |
| .।।. | .।. | |
| गोस्त दर पासरीस | कच्ची रंगावयास | |
| रुके | दिधली तरी रंगनावळ | |
| ✓१० | सक्तान | मैसीस |
| | रुके | रुके |

---

लेखांक १५ १५८६ चैत्र शुद्ध ७

सके १५८६ क्रोधी सवछरे चइत्र सुध सतमी बुधवार तदिनी खतलिखिते धनको नाम एसाजीपत आत्रे रिणको नाम गोपाल बाबाजी लेहोन दिधले ऐसे जे आत्मसुखे प्रवर्तसभधे घेतले रु। २०२ दोनी से वीस यासि कलांतर दर माहे दर सदे रु। १० पहिला महिना देउनु पुढिला महिनियात पैके राहिले तर दर सदे रु। ५ प्रमाणे देउनु हे लिहिले सही सदरहू दोनी से

रा॥ देउनु हे लि॥ सही हे पैके रा॥ नरसिंहपंतापासून घेउनु दिधले हे पैके आपण देउनु हे लि॥ सही मिकलम

गोही

| | |
|---|---|
| उधोजी झामिरे | रामाजी बाबाजी |
| मोकदम क॥ पुणे | कुलकर्णी क॥ सुपे |

---

लेखांक १६ १५८८ भाद्रपद

उत्तमगुणपरिपूर्ण निर्गविद्याशिरोमणि देवब्राह्मणप्रतिपालक माहा राज राजश्री पंताजी गोपिनाथ स्वामी गोसावीयाचे सेवेसी

॥ श्री ॥ विनंति सेवक हरि दिनानाथे शिरसाष्टांग नमस्कार विनंति उपरि एथील क्षेम ता॥ छ माहे रबिलोवल परयंत क्षेम असो गोसावियानीं आपले क्षेम लेहावया निरोप दिल्हा पाहिजे यानंतर स्वामीनी पत्र लिहिलीं पाऊन समाचार वर्तमान मनासी आला लिहिले की तुह्मी सत्वर एणे कार्य प्रयोजन उदंड आहे या एवे वेळेस रा॥ बहिरो नारायणास बराबरी घेऊन एणें ह्मणउन लिहिल तरी आमचे पुतणे येकोजीस चोरगावास पाठविले आहे-स नागपंचमी आहालियावरी त्याचा वर्तमान आह्मास कलेल व तुह्मी लिहिले की रा॥ अबाजीपंतास कागद पावते केले की नाही ह्मणउन लिहिले तरी रा॥ अबाजीपंतास हि माणूस पाठविले आहे त्यांचा वर्तमान आठ पंधरा रोजा एईल या कागद हि घेऊन एणे ह्मणउन आज्ञा केले तरी कागदपत्र काही आह्मापासी या रा॥ बहिरोपंतापासी नाहींस कागदपत्र हुकेरीस आहेत त्यांस हि माणूस पाठविले आहे ऐसा वर्तमान आहे त्याचा मार्ग लक्षीत आहो याउपरि स्वामीनें आज्ञा केली जे तुह्मी एणे ह्मणउन लिहिले तरी वर्तमान ऐसा आहे त्याचे उत्तर ए तोवरी आज्ञा जाहाली तरी राहून स्वामीने तैसे च एणे ह्मणऊन आज्ञा केली तरी एऊन बहिरोपंताचें उत्तर ए तोवरी वाट पाहातो त्याच उत्तर ए तोवरी मार्ग लक्षीत आहो उत्तर आलि याने स्वार होऊन एऊन कागदाचे उत्तर पाठऊन दिल्हे पाहिजे स्वामी ह्मणतील जे गावी राहून कुळकर्णाचा कारभार करितो तरी काही गावीचे कारभार करीत नाही या बहिरोपंताचे उत्तर ए तोवरी वाट पाहातो मग स्वार होऊन एऊन स्वामीने अभिमान धरिला आहे तो सिधी च पावेल या

अवाजीपंत हि तुमचे पत्र पावलियावरी ते हि सीर्घ च एतील जाणिजे कृपा निरतर असो दीजे हे विनति

हे विनति

---

लेखांक १७ १५८९

सुा १०७७

जावीता नागवणा वतनाच्या रामाजी
वावाजी व वावूराऊ यानी दिधल्या
आणि वाद सागोन वतन राखिलें

खर्च वाद पताजी वोकील

रुपये

३०० औरंगावादेस गेले तेव्हा सागाते खर्चास माहादावा नाईक सराफ याचें कर्ज पंचोत्र्याच्या व्याजाचे घेतले आरभी पोट-खर्चास वगैरे मुतसद्याच्या भेटीस व भेट दिवाण पातशाही व साहेव + + या कारणे घेतले

१०० शाहारास गेलियावरते परवाना मौकूफ करावयास खर्च

१०० इलतिमास लिहिणारास

४०० दिवाणाचा परवाना घेतला सनदा दाखवून अवाजी खोटा केला परवाना घेतला त्यास खर्च

मागती शाहाअलमास + + पोहचाऊन वाद्याने हुकूम दिवाणास आणिला की मुजरथीने इनसाफ करणे त्यास खोजे मीर अमीन कचेरी पातशाही त्यावर दिवाणाने इनसाफ केला त्यावर

५०० खोजे मीर याजदेखील मुतसदी खर्च याने इनसाफु करून अ + + पोहोचाविला की अवाजी खोटा त्यावर वाद्यानी सोखा करून हुकूम आणिला की परगण्याची शाहिदी पाहिजे चाकर निळो कृष्ण अमीन व सरदारवेग वाकेनवीस व मान-सिंग करोडी यास हुकूम आणिला व सजावळ तवकलकी परगणा जमा करून मनास आणुन लेहोन पाठविले त्यावर

५०० ठाणे पुणे एथे अमीनास व देसकास व सजावल सांगाते

| | |
|---|---|
| | त्यास व आणीक साहित्यास खर्च त्याचा महजर हुजूर नेला वाकनवीसास गुजराणिला |
| ७०० | कासीराम वाकेनवीस यास पूसा कासीरामाने दिवाणाचे मारुफातीने अर्ज केला महजर सही केला |
| १०० | दिवाणाचे दसखत मोकरर जाले की अर्ज मे।। करणे त्यास खर्च |
| १०० | त्यास दसखत करविले की अर्ज मोकरर पोहचला |
| २०० | दिवाणाचे दसखत करविले की महजरावरून फर्मान तयार करविणे |
| २०० | वाकेनवीसाने यादीदास्त सनदेची ठराऊन दिधली त्यास |
| ३०० | दिवाणाचे दसखत यादीवार करविले की पाहिली आणि स्वाद केला |
| २०० | फर्माननवीस त्याने फर्मान लिहिला त्यास |
| १०० | मिमीन खिदिणारास |
| २०० | मवाजनेनवीस त्याचे दफ्तरी नकल लिहे लाविली त्यास पूसा |
| २०० | शाहेनवीस हुजूर त्याजकडून हुजूरचा वाहा दाखल करऊन नकल सिहे लाविली त्यास पूसा |
| २०० | दिवाणी दफ्तरी नकल लिहे लाविली त्यास पूसा |
| (४००) | दफ्तर इस्तिफकार येथे सनद सही केली |
| ४००० | |
| २७०० | खास मोहर करविली त्यास<br>२५०० ऐन नवामदारान<br>२०० कलमदारान |
| ७८०० | |
| २६६६ | दिवाणी परवाना केला त्यास खर्च<br>२००० नजर मकरमतखान दिवाण<br>२०० दफ्तर खालसा नकल लिहे लाविली<br>२०० दफ्तर मवाजम नकल लिहे लाऊन निशानी केली<br>२४०० |

२६५ महजर दिवाणी कचेरीचा तमाम मुतसदियाचे मोहरानसी व शाहिदीनसी केला त्यास खर्च

२६६५

१००६५

१०५० हजरत जिलसुभानी तुळापुरी होते कुल परगणियास जमा करून कौल दिधला तेव्हा माहादाजी एमाजी वोकील यास वाद सागोन खोटे केले त्यास खर्च रु॥ २००० पैकी

यादी बा॥ कर्जदार खर्च वाद पताजी वोकील पाठराखा अबाजी सिधेश्वर तुरांफा त्याचि औरंगाबादेस रामाजी बाबाजी यानी वाद सांगोन बाब्रा खोटा केला त्यास कर्ज घेतले कर्ज विता॥ रामाजीपती घेऊन सरकारचे तगादे वारिले रुपये

३०० बसीधर रजपूत याजपासून घेतले

१४०० जैतसिंग बिरादर हरिराम रजपूत पवार साकीन निंबे सरकार लखनौ याजपासून सन हजार १०८५ मधे कर्ज घेऊन तगादा वारिला व्याज पचोत्रा मुदल

३०० सुखदेव याजपासून मु॥ औरंगाबाद

१९५० विश्वंभर शाडिल्या याजपासून घेतल्या मोहरा १५० दर १३ प्रो व्याज पचोत्रा प्रो

३४२० श्रीरंग त्रिवाडी नगरकर मु॥ औरंगाबाद याजपासून कर्ज घेतले मु॥ सन १०७९ मधे कर्ज घेऊन दिवाणचा तगादा वारिला मुदल

११०० मल्हारराऊ रईस याजपासून कर्ज घेतले श्रीशके १६०४ मधे आणि औरंगाबादेस सरकारचा तगादा वारिला मुदल

१५० उमदखान सन १०९६ मधे

११०१ मल्हार माहादेऊ + + + + व माहादाजी नाईक याजपासून कर्ज घेतले सन १० + + मधे मुदल ११०१ व्याज पचोत्रा

९७२१

४४ विश्वनाथभट ढेरे होन १३

३०० कर्ज माहादावा नाईक सरापूर क॥ सुपे

१००६५

| | |
|---|---|
| | यादी कर्ज बा॥ याद रुपये अमल घास्तासान |
| १४०० | असकर्ण परदेसी याचपासून घेऊन दिघले |
| ११२२ | आणीक कर्जदार याचा विष्णुभट बिन पद्मनाभभट बोकील शके १६११ कर्ज घेऊन सगादा वारिला |
| २५२२ | |

---

लेखांक १८ १५८९

तकरीरकर्दे बे॥ मल्हार बाबाजी व तिमाजी मल्हार व त्रिंबक गोमदेऊ व रामाजी बाबाजी देसपांडिये पा॥ सुपे सु॥ समान सितैन अलफ तकरीर केली ऐसी जे सामराम काटे व रुमाजी काटे देसमुख व मोकदम का॥ सुपे हरदोजण कसबाचे मोहर + + दर भांडो मागले हरदोजण काजी व देसपांडिये यांचे गोहीबेरी राजी आले राजीनामे लेहोनु दिघलेयावरी आपणास सपथ घालून पुसिले तरी मलिकाचे कारकीर्दीस याकूदखान यासी जागीर जाली ते वख्ती देसमुली काटियानी घेतली यावेरी मपाजीराजेयाचे कारकीर्दीस मोहर जाली आहे यावेरी असतखानाचे + + + + + + + देस मुसी घेतली दीड दोन वरिखे देसमुली फवयेकरीं केली त्यावेरी मागते काटे हुजूर जाउनु देसमुली करू लागले यावेरी शाहाजी राजे व सीवाजी राजे जागीरदार जाले तीन च्यारी वरसामधे मोहर केली असे हे लिहिले सही

---

लेखांक १९ १५९१ ज्येष्ठ वद्य १३

श्रीशके १५९१ सोम नाम संवछरे ज्येष्ट वदि त्रोदसी वार मगळवार तदिवसी धनको नाम असकर्णजी साहूकार यास रिणको नाम तिमाजी मल्हार व त्रिंबक गोमदेऊ देसपांडिये पा॥ सुपे सु॥ सबैन अलफ आत्मसुखे परवतसमंधे घेतले रु॥ ५० पनास यास फलतर दर माहे दर सदे रु॥ १॥ सा प्रमाणे मुदल व फलतर सारा देसी परदेसी देउनु हे लिहिले सही छ २४ मोहरम

---

लेखांक २० १६०८ ज्येष्ठ शुद्ध १

दा बे मोकदम मौजे पणदरे पा सुपे सु॥ सन हजार १०९५ कारणे साहेबांचे बादगीस कतबा लेहून दिल्हा ऐसा जे आपणावर साहेबाची बाकी रु॥ १८ राहिले आहेत ते आपण रोजा ८ देऊन हे लिहिले सही छ २९ जमादिलाखरी पाठउनु देउनु हे लिहिले सही

निशाणी नांगर.

---

लेखांक २१ १६०९ वैशाख

तुमार वासिलाती अमल खालेसे शरीफे पा॥ सुपे स॥ जुनर सुबे औरंगाबाद उरुफ दखन सु॥ सन १०९६ तहसील व तहवेल बमारुफाती सेखमहमद बकर दिवाण पा॥ मजकूर इ॥ छ माहे ता॥ छ माहे अखेर साल मो वसूल रुपये ६५५७॥.




दा देसपांडिये
पा मजकूर

मो साहजार पांचसे सतावन रुपये आठ आने रास

ता॥

| रु॥ | आ॥ | रु॥ | आ॥ |
|---|---|---|---|
| १५२०॥. | कसबे सुपे | २५।≈ | मौजे निळोज |
| ११४॥÷ | मौजे कोल्हाले बु॥ | ७४॥- | मौजे मुडले |
| ६२८ऽ | मौजे लोणी | ४५।= | मौजे कोलविरे |
| १३१॥≈ | मौजे पणदरे | २४५।= | मौजे जळगाव |
| १७३ऽ | मौजे आंबी बु॥ | १४५॥÷ | मौजे मुरटी |
| १४६॥≈ | मौजे तरडोली | ९४ऽ | मौजे नाझरे |
| ७२ऽ= | मौजे नाणोली | १०३ऽ= | मौजे देउळगाव |
| ६३।÷ | मौजे मायवडी | १२७ऽ≈ | मौजे निंबोडी |
| ८४३।÷ | मौजे कोथळे | १७॥- | मौजे मुजोडी |

| | | | |
|---|---|---|---|
| २४९।० | मौजे कुमारवळण | ७४८॥▸ | मौजे माळशिरस |
| १२९॥▸ | मौजे रिसे | १६९७५॰ | |
| ४५। | मौजे नायचली | | |
| १९०॥ | सोनवडी | | |
| ६५॥॰ | मौजे मुन्हाणपूर | | |
| २१२ | मौजे फाराटी | | |
| ६१॥ | मौजे शिरोली | | |
| ४१।▸ | मौजे शिरठाणे | | |
| ४३।॰ | कोलवाले खु॥ | | |
| ४९१०।॰ | | | |

---

लेखांक २२ १६०९ श्रावण शुद्ध १

श्रीसके १६०९ प्रमव नाम सवछरे स्रावण सुध पाडवा तदिनी गोपजी बिन रागोजी यादव मौजे माळशिरस पा सुपे यास माछजी बिन रामजी यादव मोकदम मौजेमजकूर आत्मसवोसे लेहोनु दिधले कृषिपत्र ऐसे जे काळ थोर पडिला याकरिता गाव सराय जाला लोकें कितेक मुजोन मेली किते-काची घरे बुडाली कितेक उठोन देसावेरी गेली आपला लेक रामाजी सो देसावेरी मुजोन गेला एक लेक मुगानजी आपणापासी होता तो हि पोटासाठी मुजोन मेला आपली धाईल हि मरोन गेली आपण व आपली सून दोघे उरलो अन्न मिळेना हातपाय सुजले कोण्ही हाती धरी ना मग आपणापासी मोकदमीची सनदा व वतनाचे कागद होते ते दरम्यान मुडतील ह्मणऊन हरकोण्हास मोकदमी नावनागर वतनाचे कागद व सेत घर देऊन आपला जीव वाचऊ ह्मणऊन स्रात होतो मग मागती आपण आपले मनेसी विचारून पाहिले तो तुह्मी आपला बाप माऊ तैसा च आहेत ह्मणऊन मग देशमुख व देशपांडे व गावीचे जे कोण्ही वाचले आहेत त्यांचे गोहीनसी व हामशाही गावीचे मोकदमाचे गोहीनसी मोकदमी व आपले वडीलपण नाव नागर व घर सेत कुल आपले वडिलाची जे मिरासी हकलाजिमा आहे तो तुह्मास दिधला अमे आपण वाचलो तरी जेथेरी वाचोन तो अन्नवस्त्र देणे व मेलियावेरी मुटीमाती देणे आणि वतन आपले जे मिरासी आहे ते तुह्मी खाणे आपणास

वतनास संबंधु नाही आपले घरातील आपले भाऊबंद व आपला लेक वाचोन आला तरी त्यासी मोकदमीस समंधु नाही तुह्मी सुखे लेकराचे लेकरी काळीवेरी पांढरी तोवेरीं वतन खाणे आणिकास वतनास समंधु नाही खिलाहरकती करील तो दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा अन्याई

गोही

सामराज देसमुख पा। मा। — देसपांडे पा मा।

नाईकवाडी — सीऊजी खोमणा मोकदम

तान्हाजी इतबारखान — मौजे जळगाऊ

---

लेखांक २३ १६०९

सुमार बरदास्ती वजोर ताजदी देहाय पा। सुपें सा। जुनर माहाल पायबाकी खालिसे शरीफे सु॥ सन हजार १०९७ कारणे रफायतपनाह हणमंतराऊ ठाणेदार ता। बारामती पा। मजकूर याने वजोर ताजदीने धरून नेऊन पैके घेतले बमारुफाती मा। इ॥ रु॥

१२७३८

सामरा
ज काटे देस
मुष पाा सुपे
( नांगर )

मो बारा सें त्रिहत्तार रुपये रास

देह वदेह

| | |
|---|---|
| ३४२ का॥ सुपे | ४४३ सोनवडी |
| ४८८ कान्हाटी | |
| ८२० | ४४३ |

द॥ देसपांडे पा॥ सुपे

४

लेखांक २४ १६०९

श्री

तहसमावरोसा शामराज काटे मनसबदार देसमुख व देसपांडे पा। सुपे सन हजार १०१७ तहसमावरोसा ऐसा जे रुपये ३०० तीन से बाबत महसूल माहाल पायबक सरकार अहमदनगर वगैरे बाबत तहसील मशीलतपना मह मद शरीफ करोडी सरकार मजकूर आपणापासी अमानत आहेत एकरार केला ऐसा जे सदरहू रुपये बद्दल खजाना अमरे सुबे अवरंगाबाद करून वमोहर मदसादियान खजाने आणून फरोखियास देऊन गोस्टी हिला व उजूर न करून हा तहसमावरोसा सही

---

लेखांक २५ १६०९।१६१०

तुमार बरदास्ती बजीर ताजदी देहाय पा। सुपे स॥ बुनर सालिहे शरीफे माहाल पायबाकी मु॥ सन हजार १०१७ कारणे वहबर दस्तगाहा व एक बलपनाह काफरखान फौजदार पा॥ पुणे स॥ मजकूर याने बजीर ताजदी करून धरून नेऊन पैकें घेतले तहसील बमारुफाती सीवाजी वेडगे मु॥ छोणी मुा माहले मा बसूल रुपये

२०७४।॰




दोनी हजार चोऱ्याहत्तर रुपये रास

वेहबदेह

| | | | |
|---|---|---|---|
| ११५७। | माळधिरस | ८१५॰ | ऊधी मु॥ |
| ३२॰ | कोयते | २९ | नायवडी |
| २७५ | कुमारवरन | २० | नाशरे |
| ११४ | रिवे | ४८ | सळद |
| | | २५ | कोळधीरें |
| १८७१। | | २०३५॰ | |

लेखांक २६ १६१४ भाद्रपद वद्य ७

फारसी शिक्का

[ फारसी मजकूर ]

ता। मोकदमानि व रयानि मौजे सिरसोफळ पा। सुपें सा। जुनर सुबे खुजस्ते-बुनियाद सु॥ सन ११०२ बिदानद कीं सुरो मायदेऊ जपे यासि दुमाले दरवजा करून दिल्हा ऐसा जे मौजेमजकूरचे कुलकर्ण व जोतिस अष्टाधिकार याबदल माहादाजी रखमांगदाचे वडील कोनेर कृश्ण व परसो विस्वनाथ ठोंबरा पेसजी अमल शाहाजी भोंसले अदलशाही हरदोजण भांडत होते ऐसियासि दिव हरदोजणी केले त्यास हरदोजणाचा दिवीं निवाडा जाला नाही ह्मणौऊन कुलकर्ण व जोतीस अमानत करून देसपांडियाचा गुमास्ता चालवीत होता ऐसियासि ज्याहापन्हा कबलेगाही अहमदनगरास आले ते वख्ती सुरो मजकूर खानवालाशान फकरुदीखान फौजदार थानेमजकुरास आले होते त्याजपासी उभा राहिला कीं आपलें वतन आहे त्याजवर फकरुदीखानाचे अमली सुरोमजकुरास महजर करून दिल्हा त्यास मौजे मजकूर सन———मधे वसाती जाले ऐसियासि थानेमजकुरास खानवालाशान पाहाडखान फौजदार आले त्यास सुरोमजकूर उभा राहिला त्यावर खडोजी व मेऊजी व अंबाजी आटोळे गौंड मोकदम मौजे मजकूर यानीं अर्ज केला की माहादाजी रखमांगद व विसाजी परसराम ठोंबरा हे पेसजीं भांडत होतें इ. इ. इ. छ २० मोहरम सन ३६ जुलूसवाला

लेखांक २७ — १६१५ माघ वद्य ८

श्री




स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके २० श्रीमुखनाम संवत्छरे माघबहुल अष्टमी सौम्य- वासर क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणि वेदमूर्ति जोशीराव यांचे







पुत्र ग
णेश व
शी व
शिना-
यक जो
शी गोत्र
भारद्वा
ज आश्व

लायन सूत्र यांसि दिल्हे भूमिपत्र ऐसे जे तुम्ही बहुत विद्यावंत ज्योतिषशास्त्री निपुण आणि वेदशास्त्रसंपन्न ऐसें जाणोन श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थ सहिरण्योदक धारापूर्वक तुम्हास इनाम मौजे नेरे ता। हवेली परगणे पुणे देह १ एक दर कुलबाब कुलकानू देखील हालीपटी व पेस्तरपटी जलतरुपाषाणनिधिनिक्षे पसहित पानसहित खेरीज हकदार व इनामदार करून गांव चतु सीमा भूमि पूर्वमर्यादेप्रमाणे इनाम दिल्हा असे तुम्ही आपले स्वाधीन करून घेऊन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेने अनभऊन सुखरूप असणें याशि जो कोण्ही अन्यथा करील त्यास धर्मशास्त्रींची वचनें श्लोक

बाकी देहे ५८ पैकी मुवलस वैरान सावक देहे ५

| | |
|---|---|
| ता हवेली देहे ३ | ता बारामती देहे २ |
| १ मौजे रावणगी | १ कोटपकी |
| १ मौजे नायवली | १ रुई |
| १ मौजे निळूव | २ |
| ३ | |

बाकी देहे जुजवी आबाद रजू साल गुा देहे ५३ मो जमा साल गु॥ रुपये २०००१½ वीस हजार एक रुपया यास वैरान सालमजकुराकारणे मुत लस वैरान देहे ५ एकून रुपये ५२४ पाच से चोवीस बिता

| | |
|---|---|
| ११७ मौजे खिउधि | ९५ मौजे मुरटी |
| १३९½ मौजे आबी खुर्दे | ९५ मोजे उडवड |
| ७८ मौजे मुजेवाडी | |
| ३३४½ | १९०½ |

बाकी देहे जुजवी आबाद देहे ४८ मो जमा बमोजिब साल गु॥ रुपये १९४७७ याशी कमी सालमजकुराकारणे सबब की बाराची कमी जाली याकरिता खरीफ नाबूद जाले व रबीचे बाब जाले कोठे कोठे पाऊस जाला त्याने कोठे कोठे दाणा आला जागा जागा बीघूड जाली अजी सबब कमी जाली रुपये ७६८४ बाकी जमा साल तमाम कुलबाब कुलकानू खरीप व रबी जिराईत व बागाइत बिलमस्त्वा बमब फरा घटा जमा मो॥ जमाबंदी रुपये

११३५७½

मो॥ बारा हजार तीन सें सत्तावन रुपये यास ता हवेली देहे ४२ पैकी वजा इनामती देहे २ देसमुख मालेगो खुर्द व देवपांडे शिंगापूर बाकी देहे ४० पैकी जागीर आलाहिदी साबाजी निंबाळकर देहे २ बाकी देहे ३८ पैकी मुवलस वैरान देहे सावाक देहे ३

| | |
|---|---|
| रावणगीदेहे | मौजे नायवली |
| १ | १ |

मौजे निळूव
१

बाकी देहे रुजू गु॥ ३५ मो जमा बमोजिब साल गु॥ रुपये १३३३४
यास वैराण सालमजकुराकारणे वैराण देहे ५ एकून रुपये ५२४ बित॥

| | | | |
|---|---|---|---|
| ११७ | सिउरी | ९५ | मुरटी |
| १३९ | आंब्री खुर्द | ९५ | उडवडी |
| ७८ | मुजेवाडी | १९० | |
| ३३४ | | | |

यास सालमजकुराकारणे आबाद जुजवी देहे ३० मो जमा बमोजिब साल गु॥ रुपये १२८१३ यास कमी सालमजकुराकारणे सबब बाराची कमी जाली याकरिता खरीफ नाबूद जाले व रबीचे बाड जाले कोठे कोठे पाऊस जाला त्याने कोठे कोठे दाणा आला जागा जागा बीवूड जाली सबब कमी जाली रुपये ४५७५ बाकी जमा साल तमाम कुलबाब कुलकानू खरीफ व रबी जिराईत व बागाईत बिलमखता बमय फरा व बटा कुल जमा मो रुपये ८२३८

देहबदेही

का॥ सुपे जमा कुल रुा २००१
रुजू गुा २००१ कमी ०

मौजे लोणी जमा रुा ८४१
रुजू गुा ८४१ कमी ०

मौजे ढाकाले जमा रुा ५६१
रुजू गुा ५६१ कमी ०

मौजे कान्हाटी जमा रुा ५०३
रुजू गुा ५०३ कमी ०

मौजे सोनवडी जमा रुा ३९३
रुजु गुा ३९३ कमी ०

मौजे तरडोली जमा रुा ३०२
रुजू गुा ३०२ कमी ०

मौजे देऊळगौ जमा रुा १५१
रुजू गुा १५१ कमी ०

मौजे आंबी बुा जमा १८७
रुजू गुा १८७ कमी ०

मौजे मुबले जमा रुा
२७७
रुजू गुा कमी
२७७ ०

मौजे नानोली जमा रुा
१३६
रुजू गुा कमी
१३६ ०

मौजे कोम्हाले बुा जमा
२५१
रुजू गुा कमी
५६४ ३१३

मौजे खिरखोफ्छ जमा रुा
२५१
रुजू गुा कमी
७५१ ५००

मौजे थाकी जमा रुपये
८१
रुजू गुा कमी
१९४ ११३

मौजे खिरठाणे जमा रुा
१६
रुजू गुा कमी
१०३ ८७

मौजे पणदेरे जमा रुा
२६५
रुजू गुा कमी
८३१ ५६६

मौजे माटखिरख जमा रुा
२२५

मौजे जळगौ जमा रुा
५९५
रुजू गुा कमी
५९५ ०

मौजे निंबोडी जमा रुा
१५१
रुजू गुा कमी रुा
२१३ ६२

मौजे नेपतवळण जमा रुा
८१
रुजू गुा कमी रुा
११७ ३६

मौजे छाटे जमा रुा
५५
रुजू गुा कमी
१०३ ४८

मौजे चोपडीज जमा रुा
८७
रुजू गुा कमी
२८१ १९८

मौजे कोम्हाले खुर्द जमा
३१
रुजू गुा कमी
९५ ६८

मौजे रिधे जमा रुपये
३७२
रुजू गुा कमी
७४६ ९५

मौजे कोळवीरे जमा रुा
७५

रुजू गुा कमी
७६२ ५३७
मौजे कुंभारवलन जमा रुा
६०
रुजू गुा कमी
१८२ १६२
मौजे मायवडी जमा रुा
५०
रुजू गुा कमी
५६३ ५१३
मौजे नाझिरे जमा रुा
३०
रुजू गुा कमी
२७८ २४८

रुजू गुा कमी
२४४ १६९
मौजे कोथले जमा रुा
२००
रुजू गुा कमी
९१२ ७१२
मौजे सुपे खुर्द जमा रुा
२५
रुजू गुा कमी
१४० ११५
मौजे बुऱ्हाणपूर
पायकास्ता जमा रुपये
१५
रुजू गुा कमी
९६ ८१

ता बारामती देहे २१ पैकी वजा जागीर साबाजी निंबाळकर मलेद १ बाकी देहे २० पैकी मुतलख वैराण देहे २ ता

मौजे कोटवडी
१

मौजे रुई
१

बाकी देहे आबाद गुजवी देहे १८ मो जमा बमोजिब साल गुा जमा रुपये ६६६७ पैकी सालमजकुराकारणे कमी सबब बाराची कमी जाली याकरिता खरीफ नाबूद जाले व रबीचे बाड जाले कोठे कोठे पाऊस पडिला त्याने जागा जागा दाणा आला व जागा जागा बीबूड जाली आजी सबब कमी जाली रुपये २५४८ बाकी सालमजकुराकारणे साल तमाम कुलबाब कुलकानू खरीफ व रबी बागाईत व जिराईत बिलमख्ता बमय फरा व बटा कुल जमा मो रुपये
४११९

देहबदेही

कसबे बारामती जमा रुा
३०१

मौजे कटफल जमा रुा
३५१

रजू गुा कमी
५५१ २५०
मौजे फन्हेरी जमा गा
३५१

रजू गुा कमी
४५१ १००
मौजे गोजेवाव जमा गा
३४०

रजू गुा कमी
४५१ १११
मौजे जळोची जमा गा
९५

रजू गुा कमी
१७२ ७७
मौजे पारोडी जमा गा
३००

रजू गुा कमी
३७५ ७५
मौजे माळेगौ बुा जमा
३९०

रजू गुा कमी
७०१ ३११
मौजे मेढद जमा गा
२५१

रजू गुा कमी
३९२ १४१
मौज छोनगौ जमा गा
३०

रजू गुा कमी
८०० १००

रजू गुा कमी
५०१ १५०
मौजे कांवळेस्वर जमा गा
२१

रजू गुा कमी
१०० ७९
मौजे गुजवडी जमा गा
३०१

रजू गुा कमी
६५१ ३५०
मौजे तांदूळवाडी जमा गा
१४१

रजू गुा कमी
१७५ ३४
मौजे पिंपळी जमा गा
१११

रजू गुा कमी
२२५ ११४
मौजे मेसर्डी जमा गा
१२५

रजू गुा कमी
२२५ १००
मौजे पागत जमा गा
४१

रजू गुा कमी
२२५ १८८
मौजे सायब जमा गा
३०१

रजू गुा कमी
३० ७८

| मौजे सांगवी जमा रुा | | मौजे खाडज जमा रुा | |
|---|---|---|---|
| २७५ | | ४९ | |
| रुजू गुा | कमी | रुजू गुा | कमी |
| ३७१ | ९६ | २५१ | २०२ |

---

लेखांक २९ १६१९ आषाढ शुद्ध १३

श्री




इजती असार रामाजी बाबाजी व देवाजी त्रिंबक देशपांडे पाा सुपे सन हजार ११०७ मालूम दानद की सैद जलील सावकार याचे कर्ज सरकारी आहे सदरहू ऐवजास प्रगणेमजकूरचे गाव देविले असेती त्याची सनद पेशर्जी अलाहिदी चालिली आहे बिताा

| नाझर | कुभारवाडा | मौजे मावडी |
|---|---|---|
| १ | १ | १ |

एकूण तीन गांव देविले असेती सदरहू गांवीचा जो टकापैका उसूल होईल तो महमदबेग दिा मााइले पाठविले असेती याचे हवाले करणे सदरहू गावींचा टकापैका सावकाराखेरीज तफरका न होए ते करणें जे गोस्टीनें सावकार आह्मासी रुजू हो ते ऐसे करणें सावकारमजकूर आमचा खजाना आहेती जे वेळेस दरकार होतो ते वेळेस कार्यास एताती या करिता हे काम जरूर ह्मणून तुह्मास लिाा असे सरजाम करणें राा छ ११ जिल्हेज.

मोर्तब सूद

फारसी

---

लेखांक ३० १६९९







( फारसी मजकूर आठरा ओळी )

महजरनामा अज याने सुपे सा। जुनर सुभे खुजस्तेबुनियाद सुा। सन ११०७
बिहुजूर आहालीमवाली बिवा

हजरत काजी शरा

माहाराज राजश्री दिवाण
दलसिंगजी फौजदार
पा। मार

दा। गिरजोजी आनंदराऊ
आ। देशमुख प्रा। मार

दा। रामाजी बाबाजी व
देवाजी त्रिंबक देशपांडे
प्रा। सुपे




कुतबल व संतोजी चानगुडे
व मल्हारजी सेरे व फाळोजी
भोइवे मोकदम व माहाजन सेटे
का। सुपें

(निशाणी नांगर)

अग्रवादी पश्चमवादी

काकोजी बिन हिरोजी माणकोजी बिन मेऊजी

तकरीरकर्दे अग्रवादी काकोजी बिन हिरोजी आटोले तकरीर केली ऐसी जे आपला मूळपुरुष मेंगनाक त्याचे लेक दोगजण वडील साऊनाक धाकला हीरनाक साऊनाक पडिला तो वणगोजी नाइकाचे वेळेस भांडण जाले ते वेळेस पडिला त्याउपरि हीरनाक धाकला होता त्याणें पाटिलकी केली हीरनाक पाटिलकी करितां दस्तूरखानें दिवाणें गर्दन मारिली मग साऊजीचा लेक जैतजी पाटिलकी करूं लागला जैतनाक पुणा वणगोजी नाइकाचे भांडणीं पडिला पुढें त्याचा भाऊ धाकटा काकोजी त्याणें पाटिलकी केली काकोजीला दाईजानें वीख घातले तो मेला मग माणकोजीचा पणजा मेंगनाक पाटिलकी करूं लागला तो मेलियावरी आपला बाप हिरोजी गोरा कारभार करू लागला मग गोजेबावीचे मोकदमीचे भाडण पडिले त्याबदल आपला बाप तेथें गेला व माणकोजीचा अजा हिरोजी गावीं ठेविला दोघे भाऊ एकमुख होऊन रायाराऊ दौलतमंगळियापासीं भाडण पडिले गाव घेतला त्यास पुढें हिरोजी भांडों लागला गोत कान्नाबादमांडोगणास घेतलें तों राजीक जालें राजिकाकरितां गांव वोस जाला तो तीस वरसें पडिला होता हालीं दिवाणें कौल देऊन गाव भरिला आपण गांवीं आलों भाडत आहों जे आपले वडीलपण खरें हे तकरीर सही

( पश्चमवादी माणकोजीची हि तकरीर अशी च आहे )

सदरहूप्रमाणें तकरीरा हरदूजणी केलीयाउपरि हाजीरमजालसीनें पुसिलें कीं तुह्मी कोणे गोस्टीस राजी आहा त्याविरी हरदोजणें गोतमाहास्थळ मौजे पिंपरी गुरो थळ मागितले कीं आपणास गोत देणें तेथें गोत हरदोजणास सांगेल त्याप्रमाणें वर्तोन ह्मणऊन राजी जाले पिंपरीस जाऊन पांच महिने बैसोन गोतें हरदोजणाच्या तकरीरा व कितेक फाते जे मनास आणावयाचे ते आणिले सेवट गोताजवळी गावींचे च सडीस राजी जाले त्यावरून गोतें मौजे मजकुरास सडी लिहिली कीं समस्त मोकदम व दाही जण व बलुते व मोख्तसर श्रीदेवाचे विहिरींत आघोळी करून तुळसीच्या माळा गळा घालून आपले लेंक हातीं धरून तुमचे माथा मागीमाहारीचे अशुध असे चाभारकुड व डोंबरकुंड व रगारकुड वोढून सात मडलें वोढून त्यात उभे राहाणें श्रीदेवाचे रगसिळेवर उभे राहाणें तुह्मास गोहत्या ब्रह्महत्या असेती व गुरुद्रोही मात्रागमन

सुरपान तुमचे पूर्वज स्वर्गी वाट पाहात आहेत की पुत्र सत्य वदोन उधार करील किंवा लटिके बोलोन नर्का बुडवील धर्मे आपला पिता उधरिला श्री रघुनाथें पितियाची भाक सत्य केली तैसा तुसी आपल्या पूर्वजाचा उधार करून सत्य वदोन नेमस्त करून हरदोजणांत कोणाचे वडीलपण तें लेहोन पाठविणे षदीचे प्रतिउत्तर लेहोन पाठविणें त्याप्रमाणें

१ समस्त भाऊ

१ जथे चौगुले मेळगर

१ कुळे

१ जथे माळी

१ जथे गोलाइ

१ मलुवे

यानी गाही दिधलिया जे वडीलपण असल्याचे ह ह ह

---

लेखांक ३१ १६२० आषाढ वद्य ७




(फारसी मजकूर)

हजरत असार देशमुखानि व देशपाडियानि व मोकदमानि व रयानि व मुजारियानि पा सुपे सा तुनर सुबे सुमस्तेबुनियाद सुा सन ११०६ कारणे बिदानद पा मजकुरास हजरत असार यादोजी मुधरी सेरादार करनु पाठविले आहत त्री पेशजीची कुल दफीकती आहीर करणे पेस्तर हाल मजकुरकारणे याच्ये मारफतीने साहेबकाम करीत जाणे पा मजकुरी यार्की दामदीर मजरा याह ते करणे दरी याब ताकीद दानद अज सगीर यादो तावदऊ सेरादार मातुल याचे अमलची बार्की पा मजकुरी राहिली आहे ते दर करनु पेबाक करणे एक दफा बार्की न राही जाब करणे लागेल मा

अमल बा पारसी लिहिले असे तेणे प्रमाणे अमल करणे
तेरीख २१ मोहरम सन ४०
रुजू दफ्तर हिंदवी ता २१ मोहरम सन ४०

---

लेखांक ३२ १६२१




शाहाजादे महमद
बेदारबख्त

दा बो मोकदमानि मौजे वांकी पा सुपे सुा सन ११०९ कारणे कबूल-कतबा लेहून दिल्हा ऐसा जे मौजे मजकुरास सालमजकुरी बटाईचा कौल दिधला होता त्यास पाउसाने कमी केली व गनीम रामराजा आला त्याच्या लस्कराने तमाम धामधूम करून महसूल चारून लुटून फना केला त्यावर त्याचे तंबीस हजरत आले त्यांच्या हि लस्कराने कुल पायमाली जाली याकरिता काही हाल रयतीमधे राहिला नाही त्यास मौजेमाचा माल आकार जाला त्यावर जागीरदार साहेबी सन १११२ मधे राजश्री दाद प्रभु यासि साहेबयखतयारी देऊन पाठविले की मौजे माचा हाल अहवाल ऐवज मालवज पाहोन जमाबदी मुशकस करणे त्यावरून आपणास हजूर बोलाऊन जमाबदीचे बाबे रजा फर्माविली तर साहेबी आपला हाल अहवाल ऐवज मालवज पाहोन खातिरेस आणून जमा मुशकश केलिया उगवणी करून त्यावर आपले बावे देसमुख देसपांडे पा मजकूर यानी आपला हाल अह-वाल ऐवज मालवज जाहीर केला तो साहेबी खातिरेस आणून कुलबाब कुलकानू काळी पांढरी साल तमाम बिल मख्ताहाय बटा जमा मुशकस केली त्याची उगवणी करून मा जमा बिलमख्ता रुा

२९७

---

वेरीज

देहे एकून

जकाती माहाल निमे २

वा

| अ | देहे | जकाती | पा |
|---|---|---|---|
| सुभा प्रांत सातारा | १० | ० | ५२७० |

२७० पाडळी ता सातारा
३१० मालगाव ता सातारा
३३० वोरगाव ता सातारा
१००० चिखली ता सातारा
८०० फीयळ वा सातारा
७०० इंद्रोसी वा उंबरज
३०० हिंगनोळे वा उंबरज
२०० कोळगिरे वा उंबरज

२६० वरणे वा तारगाऊ
३०० भोगापूर सुद वा तारगाऊ

५२७० १०

| | | | |
|---|---|---|---|
| प्राव जुन्नर | १ | ॥ | ६५०० |

४८०० कसबे
तळेगाऊ व चाकी
वा पावळ देह १
एकून
१७०० जकात वद
पावळ पैकी निमे
जा

६५००

| | | | |
|---|---|---|---|
| प्रांत कऱ्हाड पैकी मौजे पाडकेसी ता। नाणेघोळ देह १ एकून | १ | ० | ३०० |
| प्रांत बालाघाट पैकी कसबा कळंब देखील पेठ पा। धारूर | १ | ० | १००० |
| प्रांत पुणे पैकी जकात लोहगाऊ ता। हवेली पैकी निमे .॥. ए।। | | | |
| | १३ | १ | |
| मौजे कामेरी तर्फ वाळवे प्रांत पनाळा पेसजी हु।। सुभां पागेचे ऐवजी होता तो सालमजकुरी खासा सेनापतीच्या वेतनांत देविला देह १ ए।। सनद छ जिलकाद | १ | ० | २००० |
| इनाम देहे<br>१००० मौजे मांजरी ता। हवेली पुणे<br>५००० कसबे पाली ता। उबरज प्रा। सातारा दि।। यात्रा खंडेराऊ<br>———<br>६००० | २ | ० | ६००० |
| | | | २१०७० |

लेखांक ३७

इष्टजनमनोहर अखंडितलक्षुमीविराजित माहामेरू राजमान्य राजश्री रामाजी देसपाडे पा। सुपे

०॥ऽ)स्वामी गोसावी यास सेवक ठेवणाईत पिराजी व सुभानजि देसमुख व नरसोवा देसपांडे पाए दोणी कर जोडुनु दडवत अनुक्रमें नमस्कार विनति उपरि एथील क्षेम जाणउनु माहाराजे आपले स्वस्तिक्षेम लेखन केले पाहिजे यानंतर माहाराजे कृपा करुनु पत्र पाठविले ते सिरी धरुनु सनाथ जालो यावरी माहाराजे पैकियाचे विशी लिहिले तरी दासोपंत कामास गेले आहेत व ते आलियावरी स्वामीचे पैकियाचे विल्हे करुनु देउनु दासोपंत ८॥१० रोजा एतील सर्वेच माहालीस पाठउनु देणे आणि आपले पैकियाचे निर्गम करुनु घउनु जाणे बहुत लेहू तरी आपण सेवक असो माहाराजाचे पायासी बहु अंतर पडले आतां अंतर पडणार नाही कोप न कीजे सोडउनु लौकिक केला ते कीर्ती माहाराजाची जाली आहे आह्मी तो माहाराजाचे बहुत कृतउपकारी जाले आहो यावरी आह्मी लिहितां पुरवत नाही बहुत काय लिहिणे हे विनति

---

लेखांक ३८

महामेरु अखडितलक्ष्मीअलकृत राजमानी राजश्री आपाजी व बाबूराऊ स्वामी गोसावियासी

स्नेहांकित गोपाळराऊ सीरसास्टांग नमस्कार विनति उपरि ता। छ ७ जमादिलाखर परतु सुखरूप असो मुकाम ग्रहाचे लस्कर बालेघाट पार उतरून गेले आह्मी घोडी लसकरांत घातली आजि तिचे वाके पा। गुजोटीस देविले होते तेथील देसमुख व देसपाडे पळून गेले व वराताचे वाके वसूल जाले नाहीत व तेस हि वाके पावले नाहीत तेऱ्हा आह्मापासि आले आलियाउपरि आह्मासि + + + + काही करू न ये ते खटखट केली आह्मी वाईरान केलेयावरी ते रुपये एकशे सतेवीस व पाचे + + नीबकाने अडीच महिनेचे वेज रुपये १५ देविले ऐनु देने रुपये १४२ बेतेळीस देने यास आह्मी आपलेपासून रुपये ४० चाळीस रोजमुरातून व वेजेवा। रुपये ३९ व गुंजा-

टीव रुा ११॥ ऐनु रुा १०॥ बाद नावद दिले बाकी उरले रुा ५१॥ साडे एकावन ते ए करून देव होव त्याव आदी घाट साले जाऊ लागले मग ऐसा होई+++तुम्हापाशि पाठविले आहे तरी + + + + फाट करून देणे व घोडी सीन पाठविली आहेव सारंगी व कुमाईव ई ई. ई

---

टेंसाफ ३९

सर्वउपमायोग्य सदायश्यव राजमान राजाधिराजश्री आपाजीबावा व रा बाबूराऊ स्वामीचे सेवेशी सेवक गुवाजी नाईक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम छ २८ रमजान परियंत पातशाई लस्कर नजीक मोहोळ मधे मुसी ईदापूरचे रयत समजाविशी एथे गुतलो आहो तरी ई ई ई

---

टेंसाफ ४० १६३८

सुहुरसन ११२६ फारणे बो वापोजी वलद पदाजी हविन यापोजी चांमार याशी माहाराज राजश्री रंभाजी कदम साहेब मुतल्यार यानीं हकीमाकडून महजर करून दिल्हा त्याव तकरीर मणेप्रमाणें:—

तकरीरकर्दे बो पदाजी वा मालजी वा दमाजी
कदम चांभार का मार यानें तकरीर केली ऐशीजे
बोरटाचा दुकोळ जाला त्यापलीकडे आपला पूत्र
बाया मरेतर त्याचे पुत्र ७ पैकीं बोरटाच्या
दुकोळानून वाचिला हाणमेहतर्वा याचा लेक
दमाजी महतरी आपला जना ई ई ई

---

टेंसाफ ४१ १६५२

तकरीरकर्दे वधमगारी बो नाथे कवार व बाबूराव ..... वा गुरे गुा ११२० कारन वधारजी गवशा तकरीर बहीर दिवशा वधी ज ........ दवाजी विवक व पादी रामागद दिला नर ... पवाजी पांभराऊ

उभे राहिले तकरीर केली जे आपले हरिविष्णूनें मेगो कोतोचा कजिया जालियावर एकसे बत्तिस वरसाअलीकडे भटपणाची तिसरी तकसीम सेभरा होनास १०० जाऊबास दिधली आणि अलीकडे देसपांडेपण व कसबेचे कुलकर्ण जबरदस्तीने खाताती ह्मणोन उभे राहिले त्यावरी त्यांसी व आपणास पचायत थळमजकूर नेमून दिल्हे मग आपण व वादेमजकूर साहेबाजवळ आलो त्यावरी गोतपचाईत समस्त बैसोन आपणास फर्माविले की अग्रवादी देवाजी त्रिंबक व यादो रखमागद यानी आपली तकरीर लेहोन दिल्ही त्यावरी तुह्मी आपली हकीकती लेहोन देणे त्यावरी आपली तकरीर लेहोन दिधली जे सदरहू भाडण आजितागाईत कधी भाडले नाहीत अगर आपले वडिलीं हि सांगितले नाहीं अगर कधी यांचे हि वडील आपल्या वडिलासी भांडले नाहीत आजितागाईत भाऊपणे आहो वडील भावाचे आह्मी धाकटे भावाचे देवाजी त्रिंबक व यादो रखमांगद भाऊपणे निमे आपण व निमे आपणामागे सदरहू जण वतन देशपाडेपण व कुळकर्ण कसबाचे व भटपण जोतिप अष्टाधिकार का। मा। वगैरे वतन दो ठाई खात आलो आपले वडील वडीलपण नाव पान तहरीफ जो लवाजिमा वडिलपणाचा त्याप्रमाणे चालिले त्यामागे हरदोजणाचे वडील भाऊपणे चालिले तेणेप्रमाणें आपण चालिलो आणि आपणामागे सदरहूजण चालिले हालीं राजश्री पंतप्रधान याजवळ हरदोजण उभे राहोन फिर्याद जाले की आपले वडीलपण आहे आणि आपणावरी जोरावरी करिताती मोगलाईच्या बळें मन माने ते खादले ऐसिया तुफाने तोतियाच्या गोष्टी बोलोन सासवडाचे मुक्कामीं फिर्याद जाले त्यावरी राजश्री पतप्रधान याणीं फर्माविले कीं आपण प्रस्तुत दिल्लीहून फिरोन आलें आहो राजदर्शन जालियावर या मुलकास फिरोन एऊन आणि मनास आणूं ह्मणोन बोलिले त्यावरी राजश्री पत हजूर सातारियास गेले त्यावर दो महिन्या उपरे परगणेमजकूरच्या कारकुनास व देसमुख व देसपांडिये व मोकदमास हजूर सातारियास जमाबंदीबदल बोलाविलें त्याउपरी हजूर गेलें तेथें सदरहू जणी काजिया केला की आपले वडीलपण आहे मुचलका लेहोन बापूजीपतापासि दिधला आणि तकरीर मागतां लेहोन दिधली की हरी विष्णूने जाऊबास भटपण तिसरी तकसीम सेभरा होनास दिधली आणि देसपांडेपण व कुलकर्ण व भटपण कसबांचे वगैरे वतन मोगलाईचे बळे खाताती ह्मणोन लेहोन दिधली ऐसिया उपरि आपणास सदरहू वादियांसी

याचे हाती केसे लिहिणे देतोस त्यासी लखमावा बोलिले की सोईरा जाला तर काय जाले आपल्या पुतण्या आहे काय चिंता आहे त्यावरी चौ पाचा वरसा माहादपंत कारभार करू लागले त्यामागे विष्णुपंत कारभार करू लागले नरहरपंत जुनरी होते ते हि आले मग दोघे भाऊ जाले तो कितेका रोजा ममलकतमदार मलिक अंबर साहेबाजवळ पुणेकर देसमुखदेसपांडिये सीवाचे झगडे पुणे देशात व सुपे देशात गावगन्ना आहेत याबदल फिर्याद जाले आणि प्रसग केला हाणीन विष्णु हरदेव व जाऊ पाटिल ऐसे हजूर पाठविले तो जागीर खान अलीशान याकूदखान साहेबास मोकासा प्रा मजकूर होता त्याजवळ गेलेती कोतोवाचा लेक भगावा उभा राहिला ते खबर कळलियाउपेरि माहादाजीपंत हजूर गेल जाऊन खान अजम याकूदखान साहेबाजवळ आपली हकीकती जाहीर केली खानमाइले तेसा च आपला हेजीब बराबर देऊन मलिक साहेबाजवळ माहादपंतास पाठविले तेथ माहादपंतीं आपले जबानीं कुल हकीकत गुमास्तेमजकुराची खान अजम दस्तूरखानाचे वेळेची जाहीर केली त्यावर इनसाफ करिता दरोग बातील दिसोन आलियाउपेरि दूर केला नफरमजकुरास खुर्द खत परवाना देविला आणि माहाली महजर करावयाचा हुकूम केला त्याउपेरी माहादपंत परगणेमजकुरास आले त्यावरी विग्णोपंताचा लेक हरिपंत माहादाजीपंताबराबर कारभार करीत होता व सखोपंतीं हि केला तो माहादपंत मेले त्यामागें माहादपंताचा लेक विठलपंत कारभार करू लागला त्याबराबर त्रिंबक गोमदेऊ करू लागले करीत असता नवाब अमीर-लउमराऊ शास्ताखान साहेब सुबा पुणियासि आले ते वख्तीं बहिरो नारायण वादिया उभा राहिला की प्रा सुपाची देसपांडगिरी आपली आहे त्यावरून विठल माहादेऊ व त्रिंबक गोमदेऊ ते हि हजूर नवाबसाहेबाचे बादगीस गेले तेथे हकीकती जाहीर केली त्यावरी कचेरीवर इनसाफ टाकिला कचेरीस कुल मुतसदी बसोन मनास आणिता ना मास पुसिले की तू उभा राहिलास तर तुझी सनद असनाद टाकणे तो हागों लागला कीं सनद असनाद आपणाजवळ कांहीं नाहीं व भोगवटा वरसे ७२ नाही ऐसी तकरीर केलियावरी विठल माहादेऊ व त्र्यंबक गोमदेऊ यासि पुसिले यांहीं जाहीर केले कीं आपण काबीज मुतशरीफ आहो व सनद असनाद हि आहे सदरहू हकीकती मुतसदियानी नवाब अमीरलउमराव यासि जाहीर केली नवाबसाहेबीं फर्माविले की हरगाहा कीं काबीज मुतशरीफ बाहात्तर वरसे नाहीं आणि सनद

वाडा विकत घेतला त्याचे पत्र एकूण दोन कागद त्याजवर वासुदेव जोसी याच्या वडलाची साक्ष पणदरेकर ह्मणोन आहे व आपले भाऊपण्यात वृतीचे विभाग करून घेतले त्यावेलेस पत्रे साक्षेनिसी आहेत व वासुलकर जांबुलखोऱ्यातील वृती आपली म्हणोन वादास उभे राहिले होते तेंव्हा त्याचे दिव्य रामाजी रघुनाथ वासुलकर याणी केले तो खोटा जाला धोमचे थडीचे वृतीविसी आडकर याणी कजिया केला होता त्याचा निवाडा पंचाईतमते जाला आहे ऐसे वाद यजुरवेदीयाणी सागून वादे खोटे केले व वृती गाहाण ठेविली व भाऊपणात वृती वाटून घेतल्या याप्रो दाखल्याचे कागद यजुरवेदियाजवल आहेत जर करिता वृती वासुदेव जोसी ऋग्वेदी याचे वडलाची असती तरी इतक्या वेलेस कोठे तरी उभे राहिले आसते ती गोष्ट जाली नाही व थिटेयाजपासी वृती यजुरवेदीयाणी गाहाण ठेविली त्या कागदावर साक्षी वासुदेव जोसी याचे वडलाची आहे यावरून व सदरहू कागदपत्रावरून पुरातन वृती यजुरवेदीयाची च ऐसे स्पष्ट दिसण्यात येते व आलीकडे सन ११९५ पासून वासुदेव जोसी याचा बाप लिंग जोसी याणे दोन वेला कजिया केला तेंव्हा तो खोटा जाला वृत्याशी नव्हे याप्रो निवाडे जाले आहेत वासुदेव जोसी याजवल शके १४८६ तील व शके १५०० तील एकूण दोन कागद आहेत त्यापैकी चवदासे शासीतील कागदात पील जोसी बिा बोप जोसी कसबे वाई ऐसे ह्मटले आहे त्यास वासुदेव जोसी याचे वडील वाईस राहात आले यामुळे जोसी कसबे वाई यावरून वृती त्याची च कसी ह्मणावी दुसरा कागद तो वाघोलीचे जोतीष कुलकर्णाविसीचा आहे त्यास तो गाव या कज्याचे वृतीतील नव्हे एकूण हे दोन कागद या मनसुबीचे उपयोगी नाहीत याप्रो उभयताकडील कागदाचा मार आहे व साक्षीतील आन्वय पाहाता बहुतेकानी जोतीषपण पुरातन या यजुरवेदियाचे सागीतले आहे व काही साक्षीत माघे वाद इतराचे पडले होते त्याजला यजुरवेदियाणी खोटे केले त्या वेलेस कागद जाले आहेत त्यावर आपल्या वडलाच्या निशानिया आहेत ह्मणोन आणखी साधने यजुरवेदीयाचे साक्षीत गुदरली आहेत वासुदेव जोसी याचे साधन पाहाता काही कसबेयाचे साक्षीदाराचे बोलण्यात मूळ वतंदार लिंग जोसी ऋग्वेदी ऐसे सागोन भोगवटा हि कोठे कोठे कसब्यात चालत होता ऐसे सागीतले त्यास हाली मूळचा वतदार ह्मणोन साक्षीदारानी सांगीतले हे खरे ह्मणावे तरी कसब्याखेरीज इतर साक्षी पाहाता एका एका हि साक्षीत दाखला पुरत नाही व प्राचीन कागद यजुरवेदियाजवल आहेत त्या कागदावर साक्षी कसबे मारचे वतंदाराच्या आहेत तेंव्हा हाली बोलण्याचे प्रमाण कसे

घरावे मोगवटा चालल्याना मार तरी यजुरवदियाचे किल्ल्यात वासुदेव जोसी याच्या वडलास दिवाणचा आश्रम आणि विद्यापात्र दिवाणात पचाग सांगत यामुळे कोठे कार्य प्रयोजन सागू लागले आमचे वडील दुर्बल आणि आश्रित होते ह्मणोन व साक्षीत हि दिवाणजोसी ऐसे पुरले व पेशजी लिंग जोसी याने कजिया केला तेव्हा हि दिवाणजोसी ह्मणोन निवाडा जाहला आहे त्यास दिवाणच्या आश्रयाने याचा दाहा घरी मोगवटा जाला त्यामुळें कसबेयाच्या साक्षीत कोठे कोठे उदय पडला तो अर करिता वृत्तशी आसता तरी खोरी वगैरे साक्षीत दाखला पुरता तो काही च पुरला नाही तेव्हा वृती त्याची नव्हे याप्रो सर्व हि आन्वय पाहावा पुरातन जोतीषपणाची वृती या यजुरवेदियाची खरी आसे सदरहू प्राचीन कागदावरून व हाली चे साक्षीवरून जाले वासुदेव जोसी वृती आपली यजुरवेदी मुशालीक ऐसे ह्मणत होता त्यास साक्षीमुळे आपल्या कागदपत्री दाखला पुरला नाही खोटा जाला त्याप्रो यजिवपत्र तुह्मास आपला पुत्र बाळ जोसी याचे दस्तुरे आपले खुशीनिसी लिहून दिले आहे व हाली हे निवाडपत्र मोगवटियास तुह्मास करून दिले आसे तरी सदरहू कसबा बाई व खोरी वगैरे गाव व किल्ले येथील जोतीषपणाची वृती पुरातन तुमची आहे वासुदेव जोसी ऋग्वेदी मुशाली वृती आपली ह्मणोन कजिया करीत होता तो खोटा जाला त्याजला वतनासी संमध नाही तरी तुह्मी जोतीषपणाचे कायदे पुरातन चालत आले आसतील त्याप्रो घेऊन आपल्या पुत्र पौत्रादिवशपरपरेने वतन आनभऊन सुखरूप राहाणे मुरही खरे जाला तें सबब तुमचे माथा जीवनाभाफीक रुपये केले ते पोता जमा आसेत ह्मणोन पत्र १

सदरहू आन्वये योजन्याव साद गोशवारा लेहून जोटित पत्रे रहावी की पत्राची ताळीक घेऊन आसल पत्र यजुरवेदी जोसी याजवल परतोन मोगवटियास देणे ह्मणोन

१ देशाधिकारी लेखक वर्तमान भावी यास
१ देशमुख व देशपांडे प्रा बाई यास
१ भवाजी शंकर हैबतराव यास
१ तीन किल्यास
४ मोकदमास च्यार
  १ कसबा बाई
  २ खोरी दोन एकूण
  १ समत हावेलीचे गाव
  ---
  ४
---
१०

लेखांक १७७ १५८९ कार्तिक वद्य ७




अज रखतखाने मशरुल हजरत मैफरुलरु + + हैबतराऊ अजम ग्यानत-राव साहेब दामदौलतहू तां हुदेदारानि हाल व इस्तकबाल व मोकदमानि का। उंबरज पा। कराहाड बिदानद के अज सुहुरसन समान सितैन अलफ दरींविल हुजूर मालूम जाहले जे बहिरोजी बिन अबाजी जाधव यानी लडाई-मधे बहुत खस्त केला अखेर ठार पडिला ह्मणौन त्यावरी मेहेरवानी फर्मा-ऊन त्याचे बाप अबाजी व राडरोटीबदल इनाम पडी जमीन ।. तसि बिघे अजरामराहमत करून दिल्हे असे तरी पडी मिलामल तीस बिघे हदमाहादूद घालून दीजे बाआहूब बअवलाद व अहफाद चालविजे दर हर साल ताजा खुर्द खताचे उजूर न कीजे तालीक लिहूनं घेऊन असल परतोन दीजे जाणिजे




तेरीख २० माहे जमादिलवल
रुजू सूद

---

लेखांक १७८ १६१५ चैत्र शुद्ध ६

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेकशके १९ श्रीमुख नाम संवछरे चैत्र शुध शष्टि मंद-वासरे क्षेत्रियकुलावतंश श्रीराजारामछत्रपती याणि राजमान्य राजश्री तुलजी जाधव वजारतमाब यासि आज्ञा केली ऐसी जे तुमचे विशी राजश्री धनाजी जाधवराऊ यांनीं चजीचे मुकामी विनति केली की मा। तुलाजी जाधव यास सिलेदाराची पंचसहश्रीची सेवा आहे देशीहून कर्नाटकात जमाव घेऊन

१ या पत्रात, तें अस्सल असून, ऊनप्रत्ययात धातुसाधितें उकारान्त नाहीत.

आपणांबराबरी एकून सेवा एकनिष्टपणें करीत आहे तरी यास भाग्य देखिलें पाहिजे म्हणऊन भुत केले त्यावरून तुम्ही स्वामिकार्याचे मर्दांने व सेवा हि एकनिष्टपणें करीत आहा तुमचे उचित करणें स्वामीस अगत्य यास्तव स्वामी तुम्हांवरी दयाळू होऊन तुम्हास भाग्य पा होनु १००००० एक लक्ष होनाचें दिल्हें असे तरी घव घोडें व धव माणूस जमाव करून स्वामिसेवा प्रमानें इतबारें करीत आणें यास खासा जातीस व जमेत चाळवावयाची मोईन विता

खासा जातीस पा होनु
१००००८

भार १०० आा रास ६०० याखि
पैन रास मशुरादास्त
५७३ २५ हतीस व हत्ति
पीस चाल्वा
वेयास ५
२ उटावरील दमामा
—
२७
याखि दर सदे पधरा हजारी प्रमाणे
९००००

एकून पातशाही एक लक्ष होनाची दौलत दिल्ही असे हा सनद पा वासून खासा जातीस व भार जें जे तेरिसेस मिळामोहला नावनिशीवार गणती देऊन हुजिरी लेहवाळ त्या त्या दिवसापासून दरबारदस्तकाप्रमाणें वमावाटाऊ करून उरली वेरीज तुमच्या जमावामाफीक खासा जातीस व जमेतीस होईल ते पावेल जमाव करून रामश्री धनाजी जाधवराऊ याचे तावीन राहून इमानेइतबारें स्वामिसेवा करीत जाऊन एकनिष्टे मर्दाणें जाणिजे बहुत काय लिहिणे




रा छ ९ रमजान
तेरीख ४ श्रावान माहे श्रावन
मुा सलास तिसैन

बार सूद
संमत सुरू सूद भार

लेखांक १७९ १६२१ आषाढ शुद्ध ३




स्वस्ति श्री राज्याभिषेकशके २६ प्रमाथी नाम संवत्सरे आषाढ शुध त्रितीया भोमवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपती याणी नाईकजी जाधव मोकदम + + + उंबरज यासि दिल्हे अभयपत्र ऐसें जे तुजपासून







खून जाला याकरिता तूं परागदा होऊन गेला होतास त्याउपरि राजश्री कृष्णाजी परशराम याणी तुझें वर्तमान मनास आणून तुज कौल दिल्हा आहे परंतु तू स्वामीचें अभयपत्र नाही ह्मणून गावावरी राहोन कीर्दमामूरी करीत नाहीं ऐसें विदित जालें त्यावरून हे अभयपत्र सादर केले असे तरी तू कोणे बाबे शक न धरिता एऊन गावावरी राहाणें आणि गावची मामूरी करणे ज्याप्रमाणें तुझा निर्वाह कृष्णाजी परशराम याणी करून कौल लिहून दिल्हा असेल तेणेप्रमाणे स्वामी चालवितील अभय असे जाणिजे

निदेश समक्ष[1]




रुजू

सुरू सूद

---

१ "निदेश समक्ष" हीं सहा अक्षरें खुद्द राजारामाच्या हातचीं आहेत व सीं चागलीं वळणदार आहेत

लेखांक १८०

राजश्री पतप्रतिनिधि स्वामीचे सेवेसी

॥ श्री सकळगुणअलंकर्ण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य सेवक पादशीराऊ पापीकर दंडवत विनंति उपरि एथील क्षेम ता छ २२ मोहरम पावेतो स्वामीचे कृपेकरून यथास्थित असे का। उंबरजेमध्यें सून आहाजा नाईकजी याचव घरमेंदा जाहाला + + +

+ + + +

सेमर स्वार मोबदाद त्याचा आहे ते हुजूर चाकरी करावयासी जिवेसी रजा बंद आहेत आणि सून आहाजा ते समई ७१८ हजार रुपयाची छटी नागावा जाहाला पयोजी नेष्ठी आहेत आणि मागती नाईकजी याचवास त्वस्ट लागले आहे तरी स्वामीने पदरचे लोक लटे केले न पाहिजे पुढे फौजा जोरामार करून औरंगजेब येणे ह्मणऊन नजर धरितां आणि इत्यारमारते लोक कस्ठी करणे हे उचित नव्हे या उपरि जेसे आह्मी पदरचे लोक तैसे च ते हि पदरचे लोक आहेत त्यास कोणे गोस्टीचा तगादा होऊ दिल्हा न पाहिजे या उपरि साहेब धणी आहेत आह्मी सेवक असो या मामा कृपा करितात तैसी च आपण कृपा केली पाहिजे विशेष काय लिहिणे हे विनंति






---

लेखांक १८१ १६४१

तकरीरकर्दे कालोजी बिन जोगोजी पटेल काउजी बिन भागोजी पटेल का। उंबरज पा। कऱ्हाड सुा अशरीन मया अलफ छ माहे शौवाल केली तकरीर ऐसी जे साहेबी पुसिले की तुमचा मूळपुरुष व सटवोजी बिन समनाजी व तिमाजी बिन नरसोजी यांचा व तुमचा मूळपुरुष कैसा आहे हरदोजणापासी जमान घेऊन विचारिलें तरी आपला हरदोजणाचा मूळपुरुष दयापाटिल त्यास लेक दोघे आपला वडील जासोजी पाटिल व सटवोजीचा वडील पाकोजी पाटिल आमचा वडील जासो पाटिल यानि पाटिलकी केली पाको

पाटिल धाकटा आपली तकसीम खाऊन होता आमचा वडिल जाखो पाटिल त्याचा लेक मादो पाटिल हा पटेलकी करीत होता दामो पाटलाची बायको कमाई पाटलीण पाटिलकी करीत होती तिचे लेक तिघे जण जाले त्यास वडील लेक पाटीलकी करीत होता वडील लेक मादो पाटील दुसरा लेक मावो पाटील तिसरा लेक वहिरोजी यास हाती धरून कामाई पाटलीण पटेलिकी करीत होती त्यास मादो पाटील यास लेक कालोजी पाटील जाहला मावोपाटीलास लेक धुलोजी पाटील जाहला हे पटेलकी करीत होते कालोपाटील याचा लेक अपाजी पाटील वडील धाकटा लेक नरसोजी पाटील व लेकी चादाव जाली व अपाजी पाटीलाचा लेक तीन वरसाचा आवाजी पाटील व अंबाजी पाटलाचा चुलता नरसोजी पाटीलाची व आपाजी पाटीलाची वहीण चादावा नागोजीराऊ पाटणकर यास दिल्ही होती त्यास अंबाजी पाटिल व नरसोजी पाटिल हे धाकटी मुले होती त्यास कालोजी पाटिलास व आपाजी पाटिलास जीवकणेचे जननी चेवगत जाहाली त्याने मृत्य पावले त्यावरी मादो पाटिलाचा लेक धुलोजी पाटिल पाटिलकी करावयासी लागला तो एकनिस्टी पाहून सटवोजीच्या वडिलानी मारिला तीन वरसाचा अब्राजी पाटील होता अब्राजी पाटीलाचा चुलता नरसोजी पाटील याचा वरसाचा होता व धुलोजी पाटीलाचे लेक पाचजण होते व अबाजी पाटीलाची आई रखमावा व धुलोजी पाटीलाची वायको पिलावा हे पटेलकी करीत होती

असता त्या बाईका दुदील जाल्या मग त्या बाईकांनी आपले मिरास भाऊ गावकर व कुलकर्णी व चौगला व सेट्या व कोष्टयाचा मेहऱ्या व माली याचा मेहऱ्या ऐसे बोलाऊन व वैते व जे मिरासदार होते तितके बोलऊन अणून त्यास विचारिले की आपला दादले मारिले मारा करून पळोन इंदोलीस गेले आपणास तुह्मी भाऊ आहा काय सागता त्यावरी ते बोलिले जे सटवोजीचे वडील नाइकजी अंबाजी आपली तकसीम खात असता हाक नाहक मारा करून गेले त्यास सुखरूप जाऊत तुमची मुले नेणती आहेत धीर टाकू नका तुह्मी आपला कारभार करा ऐसा धीर भरवसा देऊन सर्वस्वे अगीकार करून बाईकाच्या हाते कारभार घेऊं लागले त्यावरी सटवोजीच्या वडिलानी इंदोलीहून एऊन कुलकरणी मारिला व चौगुला मारिला व सेट्या मारिला कोस्टेचा मेहेऱ्या व माळियाचा मेहेऱ्या हे हि मारिले ऐस पाच खून केले जे बाई-

काम धीर देऊन कारभार करित होते त्यानिमित्य मारिलेयारि बाईका धाविन्या जाल्या मग रखमाबा व पिलाबा मुले हाती धरून मुलास मारावया जपो लागले मग काळो पाटीलाची लेक चांदाबा पाटणकर नागोजीराऊ यास दिली होती त्या आभमाने रखमावा व पिलावा मुलें घेऊन पळोन गेली सटवोजीचे वडिल मारा करून पळोन इदोलीस गेले त्यास दुसरा मोकाशी आला त्यास भेटोन फौज घेऊन गावांत आले जोरावारीने पटेलकी करूं लागले त्यास मुले व बाईका पाटणी होती त्यास नागोजीराऊ पाटणकर यास देशाश जाली त्याचा लेक हिरोजीराऊ बारा वरसाचा होता त्याचे बापभाऊ त्यास मारावया जपो लागले त्याची आई चांदावानें आपल्या लेकास पळऊन भावळेयास पाठविले त्यावरी काळो पाटीलाचा लेक आपाजी पाटील व धुलो पाटिलाचे लेक पांच जण वडील लेक रामाजी पाटिल दुसरा चांगो पाटिल तिसरा काऊजी पाटील चवथा बहिरोजी पाटील पांचवा मवाजी पाटिल व रखमाबा व पिलावा ऐसी पाटणांत राहिली पाटणी राहून उबरजेवरी दावे केले दावे करितां करिता चांगो पाटिल व काऊजी पाटिल व बहिरोजी पाटिल हे तिघे सटवोजीच्या वडिलांनीं मारिले त्यावरी हिरोजीराऊ पाटणकर व आपला वडिल अबाजी पाटिल मावळेमध्ये होते त्यास गोंदाजी घोरपडे भावळेकर त्यांनीं आपली कन्या हिरोजीराऊ पाटणकर यासी दिली लग्न जालेयरी हिरोजीराऊ पाटणास यावयास सिध जाले त्यावरावरी अंबाजी पाटिल हि निघाले मग गोंदाजी घोरपडे यानी येमर भार हिरोजीराया बरावरी देऊन पाटणास जबरदस्तीने पाठविले हिरोजीरायानी आपले भाऊ-बंदास नसीयत करून वतन खाऊन लागले मग हिरोजीरायांची माय चांदाबाने लेकास सांगितले जे तुम्ही आपल्या वतनावरीं एऊन बैसला आणि आपले माचे आपल्या वतनावरीं तुम्ही नेऊन बसवा ना तेव्हां थोरले राऊ तुम्हास भर्गी इसतील त्यावरी हिरोजीरायानी मान्य करून आपले वचन खरें करिसों ऐसी गोष्टी जाहाली हे वर्तमान सटवोजीच्या वडिलानी ऐकिलें मग ज्यानी मारा केला होता त्यानी नाइकजी अबाजीने रवद विस्यापुरास जात होती ते लुटली ते दिवाणास कळले त्यानिमित्य कैद करून दिवाणानें नाईकजी अंबाजीची चोचकी मारिली नाइकजी अबाजीचा भाऊ दिवजी व त्याचा लेक लखमोजी व अबाजीचा लेक नरसोजी हे सटवोजीचे आजे अबाजी पाटिल व रामजी पाटिल पाटणी होते त्याचे समजाविशीस आले मग अबाजी पाटिलाने हिरोजीरायास सांगितले जे आपले भाऊबंद गांवी

होऊन समजाविसीस आले आहेत त्यास हिरोजीराऊ बोलिला कीं त्यानीं गोत्रहत्या केल्या आहेत त्याचे तोंड पाहूं नये मग अबाजी पाटिल व रामजी पाटिल बोलिले कीं आपले मारे केले त्याचा जवाब करितील मग मुतालीक हाती देईन मग त्यास हिरोजीरायाने सटवोजीच्या आज्यास लख- मोजीस व नरसोजीस बोलाऊन पुसिले जे तुह्मी मारा केला त्याची वाट काय करिता त्यावरीं लखमोजी व नरसोजीने जाब दिल्हा ज्यानी मारा केला ते आपल्या कर्मे गेले आपल्याच्याने खुनाची वाट होती ऐसे नाही आपली तकसीम आह्मी खाऊन राहू त्यानी रामजी पाटिलाने व अंबाजी पाटिलाने गावास यावे आपला कामकारभार व निमे तकसीम व वडीलपण करावे माहार नांगर पटि पछोडी जे वडिलपणाचे मान जे असतील ते खावे ऐसी बोली हिरोजीरायांसी त्यानी केली मग हिरोजीरायानी अबाजी पाटिलास रामजी पाटिलास बोलाऊन सांगितले जे तुमचे भाऊ न्यावयास आले आहेत तरीं तुह्मीं गावास जाणे त्यावरून अंबाजी पाटिलानें व रामजी पाटिलानें विचार करून हिरोजीरायास जाब दिल्हा जे आपले पोटी संतान नाही हे गावास नेतील आणि दगा करितील आपल्याच्याने गावास जावत नाही लखोजीचे व नरसोजीचे मनामध्ये समजावीस करून न्यावयाचे असेल तरी मुतालीक देऊन त्यावरून लखमोजीने व नरसो- जीने आण भाश क्रिया करून हिरोजीरायाचे गुजारतीने आमचा मुतालीक हाती धरून गावास आले गावी मुतालीक आपले वडिलपणाचा काम कारभार करू लागला एक दोनी साले गावी होता त्यावरी हिरोजीरायावरी विज्यापुरीहून मोहीम जाहली ते मोहिमेमध्ये पडिले ऐसे ऐकून त्या माघारे मुतालीक मारला त्यावरी अंबाजी पाटिल व रामजी पाटिल या दोघामध्ये सांत पांच लेक जालेवरी अंबाजी पाटिल व रामजी पाटिल हे गावास आले मुतालिकाची वाजीपुसी केली त्यावरी कऱ्हाडीच्या दिवाणास सटवोजीच्या वडिलाने सांगितले कीं हे ह्मणजे हिरोजीराव पाटणकर याचे मेहुणे आहेत मग कऱ्हाडच्या दिवाणास सांगोन धरून नेले उपरातीक कऱ्हाडीच्या फौजदाराने हुजूर पातशाहास लिहि- ले जे हिरोजीराव पाटणकर याचे मेहुणे आबाजी पाटिल उंबरजकर धरून आणिले आहेत त्यासी ठेवावे की जिवे मारावे या बाबे जो हुकुम येईल त्या- प्रमाणें वर्तणूक करू ऐसे लिहिले उपरी मग यानतरायानी पातशहास अर्ज केला जे हिरोजीराव पाटणकर पुड होता तो मारिला गेला हे त्याचे सोइरे आहेत उंबरजचे पाटिल आहेत सोइरे जन जनाचे असताती परंतु सोइरे

करिता सोइरे मारीत नाहीत तरी साहेबी मेहेरबान होऊन पटेल मजकुरास सोडावयाचा हुकूम देविला पाहिजे ऐसा अर्ज केला यानतरायानी केला त्या वरून पादशाहानी हुकुम दिल्हा तो हुकुम यानतरायानी कन्हाडास पाठविला मग कऱ्हाडीच्या फौजदाराने तो हुकुम मानून आंबाजी पाटिल सोडून दिल्हा मग आंबाजी पाटिल गावास आले पटेलगीचा कज्या आला मग आगासाहेब मोकाशी यानी पटेलगी अमानत ठेविली आणि यळ मौजे मारुल दिल्हे आपण मारलेस गेलो मारलेस गेलेयावरी मागे आगासाहेब मोकाशी तगीर जाहाला त्यावरी विज्यापुराहून सुलतानखान मोकाशी होऊन आला मग गावास आलेयावरी हे खबर मारलेमध्ये ऐकिली जे मोकासी गावास नवा आला आहे त्याने धामधूम फार केली आहे ऐसी खबर ऐकून गावास आले मोकासी याची भेटी घेतली उपरातीक कामकारभार करावा तरी पटेलगी अमानत आगासाहेबाने केली होती मग पुढे सुलतानखान मोकासी याने आमच्या वडिलास व सटवोजीच्या वडिलास बोलाऊन नेले जे तुम्ही दोघे जण काम कारभार करणे दिवाणकाम चालवणे तुमचा हक इनाम पालक पटि पछोडी होळीची पोळी व माहार नांगर ऐसा दिवाणी आमानत ठेविला आहे जोवरीं त्यांचा व तुमचा कजा निवडे तोंवरी अमानत ठेविला आहे तुम्ही उभयता आपले गाविचा कामकारभार करणे मग इतकी कलमे अमानत ठेवल्यावरी आपले वडिलास व सटवोजीचे आजे वडील कामकारभार करीत असता थोरले माहाराजाची स्वारी आली गाव लुटला गावास खाण तिज्या लाऊन लुटून नेला मग गाव लुगलेभावरीं यानतरायास मोकासा जाहला मग गावास कौल दिल्हा गाव भरल्या उपरांतिक कामकारभार पूर्वी चालत आला मग महाराजानी सारा मुलूक कबज केला महाराजांच्या राज्यामध्ये पूर्वी चालिले तैसे च पुढें ही चालले दोघे कामकारभार करित असतां पुढें आंबाजी पाटिलाचा लेक आमचा वडील काळो पाटिल व रामजी पाटिलाचा लेक मागो पाटिल व सटवोजीचा वडील लखमोजीचा लेक दताजी व नरसोजी व आमचा वडील ऐसे मिळून दिवाणामध्ये पटेल गीच्या कजिआ निवाडावया बदल उभे राहिले त्यास थोरले माहाराज चंदीचे मसलतेस चालिले चंदीची मसलत करून आलेयावरी तुमचा व त्याचा निवाडा कला जाईल आम्हावरावरी स्वारीस चालणे स्वारी करून एऊन मग तुमचा कज्या निवडा ऐसे महाराज काळो पाटिलास बोलिले मग काळो

पाटिलाने अर्ज केला जे आपले वतनाचा कज्या आहे आपणास जागा सोडून एता न ये माहाराज जे चाकरी फर्मावितील ते एथे च करीन मग खटावी साबाजी घाटगे ठाणे घालून मुलुकामध्ये धामधूम करीत होते त्यावरी सखोजी गाइकवाड फौज देऊन रवाना केला त्याबराबरी कालो पाटिल दिल्हे जे एवडी मसलत करून एणे मग खटावावरी स्वारी गेली तेथे जुज जाले त्या जुजामध्ये कालो पाटिल साहेबकामावरी चीज जाहाले साहेबकामावरी पडिलेवरी आमचा कमजोर जाहाला मग सटवोजीचा आजा नरसोजी व लखमोजी याने अमानत सोडून हक दक खाऊ लागले मग चदीचे स्वारीहून माहाराज फिरोन आले आपला बाप जोगोजी पाटिल व भागोजी पाटिल जाऊन उभे राहिले महाराजास अर्ज केला आपला चुलता कालो पाटिल साहेबकामावरी पडिला पुढे बापभावानी कज्या करून अमानत मोडून हक लाजिमा खातात्ती ह्मणोन माहाराजास अर्ज केला मग हुकुम केला जे तुह्मी सुभा जाऊन उभे राहाणे आपला कज्या निवडून घेणे मग निरोप घेऊन गावास आले सुभेकडे जावे तों माहाराजास कैलासवास जाला त्यावरी माहाराज शंभू सिंहासनारूढ जालेवरी मग जोगोजी पाटिल व भागोजी पाटिल माहाराजाचे भेटीस गेले भेटी घेतली मग अर्ज केला जे आपल्या वतनाचा कज्या आहे सटवोजीचा वडील नरसोजी व लखमोजी जोरावारीने जे अमानत मोडून पटेलगीचा कारभार करितात्ती त्यास माहाराजानी कोनेर रंगनाथ सुभेदार यावरी मनसुभी दिल्ही मग निरोप घेऊन गावास आले गावास येऊन सुभेदाराचे भेटीस गेले भेटी घेतली सुभेदारास राजपत्रे होती ते दिल्ही सुभेदार निघोन उबरजेस आले बारा बलुते व सिवधडे पाटिल बोलाऊन आणून उभयताची मनसुबी मनास आणून जोगो पाटिलास विचारले जे तुझा करीना कैसा आहे तो सांगणे मग आपला करीना सविस्तर सागितला आमानत मोडिले ऐसा करीना सुभेदारापासी सागितला मग सुभेदारानी दिवाणचे अनामत मोडिले ह्मणून चार हजार टके सटवोजीचा चुलता तिमाजी व दताजी पासून घेतले तो मनसुभी होत च होती त्यावरी माहाराजानी कोनेर रंगनाथ सुभेदार हजूर बोलाऊ पाठविले मग सुभेदारानी मनसुभी तहकूब केली जे येका दोनी महिनीयात निवाडा करून विल्हे लाऊन देऊन मग सुभेदार हजूर गेले त्यावरी सुभेदार निरोप घेऊन माघारे सातारेस आल त्यावरी आपले बाप जागोजी पाटिल जाऊन गौळमाडवेत

राहिले वस्ती केली उदईक उठोन सुभेदाराचे भेटीस सातान्यास जावे तो रात्री सटवोजीचे छोहरे गोंदजी पाटिल व सळोजी गावव व मांग व फिरोलीकर रखलोजी पाटिल यानी येऊन आपला बाप जोगो पाटिल मांडवेत मारिला त्यावरी पुढे माहाराज संभु पावशाहाकडे गेले धामधूम फार जाहली मुलूक मोस पडिला वेव्हार तैसा च राहिला मग सर्वांखान येवला माहाराज राजाराम छत्रपती यानी मुलकास कौल देऊन मुलुक भरविला त्यास गाव भरावयास कौल द्यावयास तिमाजी दताजी व महिरोजी सटवोजीचे चुलते ऐसे मानजी गोपाळ सुभेदार याकडे गेले कौल घ्यावा तो नाइकजी व मागोजी पाटिल यानी सुभेदाराकडे जाऊन कौल राहविला की आपले वतन वडीलपणाचा कथला आहे अमानत चालत आले गाव लावावयास कौल घ्यावयास हे कोण आहेत म्हणून खटखट केली त्यास तिमाजी व दताजी व महिरोजी पाटिल सटवोजीचे चुलते व आपले मालू यास व नाईकजी व मागोजी पाटिल यासी सुभेदार व मानजी गोपाल सुभेदार व मोरेश्वाच्या सवनीस व जानोजी मोहिते पाटिल कसबे तळबीड गोत मिळोन गाव न भरिता कथला कथास करिता अमानत गाव लागे तोवरी नांगर व हक व पानमाम व होळीची पोळी द्यावे गवे गळा आसो वैणे गावाला गेलेवरी निवाडा करू म्हणून ऐसे बोलिले तिमाजी व दताजी व महिरोजी हे रजावद जाले नाइकजी व मागोजी पाटिल हे रजावद जाले हरदोजणापासी जामीन घेऊन गाव लावावयास रजा दिल्ही गाव उभयतानी मिळोन लाविला दाहा पाच साले ऐसे च चालत आले त्यावरी माहाराज राजाराम साहेब चंदीहून सातारेस आले मागती तिमाजी सटवोजी जाधव यास घेऊन माहाराजापासी उभे राहून फिर्याद केली मग माहाराजानी रामचंद्रपंतास सांगितले जे यांचा कज्या काय असेल ते मनास आणणे मग पंती आज्ञावरी मसाला करून हुजूर नेले करिना विचारला त्यास त्यांचा आमचा करिना तळबीडचे थळी माहाला तो सांगितला तो करिना मनास आणून मागती तिमाजी यमाजी सुभेदार त्याकडे पाठविले जाऊन हर्दूजण सुभेदारास भेटले सुभेदारानी करिना विचारिला त्यास करिना जाहिर केला मग हर्दू जणापासून जमान घेऊन तळबिडास थळास पाठविले आम्ही उभयता थळी जाऊन उभे राहिलो मग जानोजी मोहिते व गोत बोलिले की पहिले अमानत होते तेसे च आता आसो वैणे दिपवाळीस निवाडा करून देऊन मग तिमाजी

व सटवोजी व आह्मी मिळोन गावावरी आलो गाव लाऊन गावावरी राहिलो पानमान नांगर व होळीची पोळी देवाची या मुलुकात पातशहा आले मुलुक लुटिला सातान्यास वेढा पडिला आसीनखान कराडास येऊन ठाणे बांधले मुलुकास कौल दिल्हा गावगन्नाचे पाटिलास बोलाऊन तश्रिफा ध्यावयास नेले तेवेळेस तिमाजी पाटिल सटवोजीचा चुलता व आह्मी मिळोन तश्रिफा उभयतास दिल्या त्या अमानत घेऊन गावास आलो तिमाजी बोलिला जे तश्रिफा अमानत ठेवीत नाही ते आह्मी ऐकोना मग तिमाजी सटवोजीचा चुलता कन्हाडास गेला असीनखानापासी जाऊन सागितले जे नाईकजी व कालोजी गनीमाई करितात ह्मणून च्यार चुकल्या सांगितल्या त्यावरून असीनखानाने आमचे कबीले व आह्मास धरून न्यावे ऐसा तह केला ते खबर आह्मी ऐकिली इतके करून धीर धरून होतो तो महादजी जगदळे यानी शामराऊ सेखदार मसूरी होता त्यासी रदबदल करून अमानत मोडिले होळीचीपोळी तिमाजीचे हवाला केली ऐसी जारावारी जाल्यावरी आपण गावाबाहीर पडिलो त्यावरी गाव लागेनासा जाला मग सटवोजी व तिमाजी आईसाहेबाकडील अतोजी डावरा ऐसे मिळून माधवरायाकडे गेले त्यास गाविचे वर्तमान सांगितले गाव आईसाहे-बाचा आहे गाव पडिला तरी नाईकजीस व भागोजी पाटिल बोलाऊन आणून त्याची सटवोजीची समजावीस करून देणे त्यावरून रायानी बोलाऊ पाठविले मग आह्मी गेलो रायाची भेटी घेतली त्यानी आह्मास हकीकत विचारली आमची हकीकत होती ते आह्मी जाहीर केली अमानत दिवाणात जाऊन मोडिले आह्मास दिवाण मोगली भेटावयास नये चार तुफाने केली त्याकरिता तिमाजी जाऊन दिवाणात लाच लुसबत देऊन अमानत मोडिले याकरिता आह्मी गावाबाहीर पडिलो ऐसी हकीकत रायास विदित केली त्यावरून रायानी सटवोजीस व तिमाजीस पुसिले जे तुमचा यांचा कज्या असता अमानत मोडिले हे तुह्मास बरे नव्हे त्यावरी सटवोजी व तिमाजी बोलिला जे अमानत कोणीही केले नाही त्यावरून आपण जाब दिल्हा जे तळबीडचे पाटील जानोजी मोहीते व भानजी गोपाळ सुभेदार व मोरो उधव यानी अमानत केले आहे यास सडी पाठविणे त्याचे उत्तर आल्यावरी आह्मी ह्मणतो हे खरे की लटके मग रायानी कागद देऊन त्याला व आह्माला तळबिडास मोड्यास पाठविले तळबिडिहून गोताचे कागद तिमाजीस

व सटवोजीस आणिला जे तुसी उभयतानी गाव लावावा हक्क राजीमा होणी पोळी अमानत देसापासी ठेविली इतके न करिता तुसी अमानत मोडिले हे उचित केले नाही ऐसा कागद तिमाजीस आणून दिल्हा मग तो कागद रायानी पाहिल्या रजू मोकासिला जाला मग रायानी जे सट-वोजीस व तिमाजीस विचारले जे याची वाट काय करिता त्यांस त्यानी उत्तर दिल्हे जे पुर्वी अमानत चालत आले आहे त्याप्रमाणें पुढे ही चालवावे आणि आमच्या भावास समजाऊन गावास लाऊन द्यावे ते व आसी एक मते राहून ऐसे बोलिले त्यावरी रायानी अमानत ठेऊन थळास लाऊन दिल्हे थळास रजावद आहा की नाही ऐसे आह्मास व त्यास विचारले त्यानी सटवोजीने व तिमाजीने रजावद होऊन राजीनामा लेहून दिल्हा व आह्मी राजी होऊन राजीनामा लेहून दिल्हे हर्दू अमापासी जमान घेऊन सोमयाच्या करन्यास चीरपत्रे देऊन पाठविले मग आपण निरोप घेऊन थळास गेलो थळकरियासी ते व आसी भेटलो थळकरियानी करिना विचारला जे वशपरपरा लेहून देणे ह्मणून आम०॥ केली आह्मी व तिमाजीने व सटवोजीने वशपरपरा लेहून दिल्हे मग थळकरियानी निश्चय केला जे याही लावाव्या ऐसे केले अगर बेल काढून द्यावा अगर मासीचे उदक आणावे ऐसे तीन दिव्य नेमून त्यास तिमाजी व सटवोजी पाटील नामुकूर होऊन खलवाद करून पांढरीवरी च दिव्य करू ह्मणून बोलिले बोलिल्याप्रमाणे थळकरीयानी कागद दिल्हा तो कागद आह्मी घेऊन जाधवरायापासी आलो जाधवरायानी कागद मनास आणून लटके ऐसे ध्यानास आले मग दोघाची समजावीस केली जे दीपवाळी करिता गावावरी दिव्य देऊ ऐसे करून अमानत करून आह्मास गायास पाठविले मग जाधवरायाची पाठी करून जाधवरायानी सटवोजीस अहीनखानाचे हाती दिल्हे मग ते उमरनेमध्ये कोट बांधोन जोरावारी करून राहिला बळे च वतन खात आहेत आह्मी परागदा होऊन फिरत आहो जाहाला करीना चांदगीस लेहला आहे हे तकरीर लिहीली सही वळी सुमार ४२५ मंद ११

( निशाणी नांगर )

---

लेखांक १८२ १६४२ आपाढ शुद्ध ७







श्री

स्वस्ति श्री राज्याभिपेक—शके ५१ क्रोधिनाम सवत्सरे आपाढ शुध सप्तमि भोम वासरे क्षत्रिय—कुलावतस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामि याणि सेटे—माहजनानी व रयानी का।। उंबरज पा। कराड यांसि आज्ञा केली ऐसि जे कालोजी बिन जोगोजी जाधव पाटिल का।। मा।र याणे स्वामि-सनिध येऊन विनति केली की का।। मा।रची पाटीलकी महतकदीम आपली त्यास आपला गोत्र—पुरुप सटवोजी बिन शमनाजी जाधव याणे आपणासि कथला वडीलकीकरिता आरभिला आहे आणि आपण वडील ह्मणवितो त्यास त्याचा व आपला मूळपुरूप येक वडील घर पान मान आपलें ऐसें असतां सटवोजी रेटाई करितो त्यास सटवोजीचे वडिलांनी आमचे वडि-लांसि पुर्वी इदलशाही कारकिर्दीस वडीलकीकारितां कथले बहुत करीत आले परंतु आपले वडिलिं सटवोजीचे वडिलास वडिलकीचे पानमान घेऊ दिल्हे नाहीं मधें दिवाणीतून एकदोनि वेला स्थलास हि त्याचे वडिल व आपले वडील निवाडियाबद्दल जाऊन स्थलीं मनसुबी होऊन स्थल—पत्रे आणीली तेव्हा सटवोजीचा वडील दताजी व तिमाजी खोटे जाले असतां मागती सटवोजी कथले करितो या करिता स्वामीनीं आपले कागदपत्र मनास आणऊन वर हक निवाडा करावा ह्मणून विदित केलें त्यावरून मनास आणिता मूळपुरुष कालोजी जाधव याचा व सटवोजी जाधव याचा ऐक परंतु वडील जाखो पाटील व धाकटा पाको पाटील या दोघां भावाची संतत हे दोघेजण वडीलपण पानमान नाठार जाखो पाटील याचा त्यास याचा वंशज कालोजी पाटील या कारितां वडीलपण पानमान नागर कालोजी पाटील याचा धाकटा पाको पाटील याचा वंशज सटवोजी बीन शमनाजी

याणें वडीलपण व नांगरखेरीज आपली निमे तकसीम पाटीलकी मात्र खाऊन असावें ऐसे असता सटवोजी पाटील उगा च वडीलपणाकरितां कथले करितो त्यास स्थलींचीं पत्रें व वरकड कागदपत्रावरून पाहातां काळोजीनें मूळपुरुष भोगवटा लेहून दिल्हा त्यावरून धर्मता त्रिविधप्रकारें काळोजी जाधव पाटील का॥ मजकूर हा वडिलकीस खरा आहे याकरितां याणें वडीलपण पानमान नागर निमे पाटीलकीचा कारभार करून पाटीलकी अनभवावी व सटवोजी जाधव आपण वडील ह्मणऊन कथला करीत होता परंतु मूळपुरुष वंशावली व भोगवटा व स्थलीची व वरकड पत्रावरून वडीलपणास लागू होत नाहीं भाकऱ्या भाषाचा वद्य सटवोजी याणे निमे पाटीलकीची तकसीम अनभवावी ऐसे जालें त्यावरून याप्रमाणें चालवावया ची आज्ञा करून तुह्मांस हें आज्ञापत्र सादर केलें असे व सविस्तर निवाड- पत्र आलाहिदा दिल्हे आहे तरी तुह्मी का॥ उमरज येथील निमे पाटीलकी वडीलपण पानमान नागर काळोजी बीन जोगोजी पाटील यास व निमे पाटीलकी सटवोजी बीन धमनाजी यास ऐसे हरदू जणास वशपरंपरेनें चाल- वावयाची आज्ञा केली असे यास कथला होऊ न देणें यापत्राची तालीक लेहून घेऊन असल काळोजी पाटील याजवळ परतोन देणें जाणिजे निदेश समक्ष




सुरु सुद बार

---

लेखांक १८३ १६५१ भाद्रपद शुद्ध ७




श्री




स्वस्ति श्री राज्याभिषेकशके ५६ सौम्या नाम संवत्सरे भाद्रपदशुध सप्तमी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यांणीं मुकदमानि

कसबे उंबज सुभा प्रा सातारा यांसि आज्ञा केली ऐसी जे कालोजी बिन जोगोजी पाटील कसबे मजकूर हे स्वामीच्या राज्यातील पुरातन सेवक वडील वडीलापासून स्वामीच्या पायासि निष्ठा धरून त्रिकर्णशुद्धीने सेवा केली याचे बाप व आजे स्वामीकार्यावरि पडिले व हाली याचे भाऊ खेत्रोजी जाधव राजश्री उदाजी चव्हाण हिमतबाहादर यासमक्ष साहेब-कामावरि खर्च जाहाले आणि मशारनिलेहि स्वामीच्या पायासि एकरूप निष्ठा धरून मनोभावे सेवा करीत आहेत याणी किले पनालाचे मुकामी स्वामीसंनिध विनंति केली की आपण स्वामीच्या राज्यात वडील वडिला-पासून सेवा करित आहों माहाराजानी मेहेरबानगी करून कसबे मजकूर आपले पाटीलकीचा गाव आपणास लेकराचेलेकरी चाले ऐसा इनाम करून द्यावयासि माहाराज समर्थ आहेत ह्मणून विदित केले त्यावरून मनास आणितां मशारनीले पुरातन वडिल वडिलापासून निष्ठेने वर्तत आहेत याचे बाप आजे भाऊ स्वामि कार्यावरी खर्च जाहाले याचे सर्वप्रकारें चालवणे हे स्वामीस परम अवश्यक हे वतनदार प्रामाणिक याकरिता स्वामीयाजवरी कृपाळु होऊन यास नुतन इनाम कुलबाब कुलकानू हाली पटी व पेस्तर पटी जलतरूपाषाणनिधिनिक्षेपसहित खेरिज हकदार व इनामदार करून कसबे मजकूर याचे पाटीलकीचा गाव यास इनाम अजरामऱ्हामत करून दिल्हा असे तरी तुह्मी याचे रजातलबेत वर्तोन गावचा ऐवज सुरक्षित देत जाणे आणि मौजे मजकूर इनाम यासि व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवित जाणे निदेश समक्ष




रुजू

सुरुसूद बार

---

लेखांक १८४ १६५१ भाद्रपद शुद्ध ७

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेकशके ५६ सौम्यनाम संवत्सरे भाद्रपदशुध सप्तमी

मेदवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यांणी राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रा सातारा योंसि आज्ञा केली ऐसी जे राजश्री काळोजी बिन खोजोजी जाधव पा

श्री आदि पुरुष श्री राजा शिवछत्रपती स्वामि कृपानीधी ॥ तस्य प रशुराम त्र्यंबक प्रतिनिधि

श्री
राजा शंभु छ
त्रपति हर्ष निधा
न दामोदर सुत चि
मणाजी पंडित
मुख्य प्रधान

टील कसबा उंब्रज हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ट सेवक यांचे आजे काळोजी जाधव सटावाचे मुक्कामी तांम्राचे जुंझी सीर्यस्वरूप राजश्री थोरले कैळासवासी स्वामीचे वेळेस स्वामिकार्यावरी पडिले व यांचे बाप थोरले राजश्री संभाजीराजे यांचे कारकीर्दीस तांम्राचे युद्धप्रसंगी तेही स्वामिकार्यावरी खर्च जाले व यांचे भाऊ खेत्रोजी जाधव राजश्री उदाजी चव्हाण हिंमतबाहादर याजबराबर स्वामिकार्यावरी पडिले मशारनिले स्वामीच्या पायासी निष्टा धरून एकरूप निष्टेनें सेवा करित आहेत स्वामीच्या पायाविना दुसरे जाणत नाही सांप्रत यांणी स्वामिसंनिध विनंती केली कीं कसबे मजकूर माहाराजानी मेहेरबान होऊन इनाम करून दिल्हा पाहिजे म्हणून विदित केले त्यावरून मशारनिले स्वामीचे पुरातन यांचे बाप आजे स्वामिकार्यावरी खर्च आले आहेत यांचे सर्व प्रकारे चालवणें स्वामीस परम अवश्यक यास्तव स्वामी यांजवरी कृपाळू होऊन यास कसबे उंबरज सुभे मजकूर देह १ एक गांव नूतन इनाम कुलबाब कुलकानू हाली-पटी व पेस्तर-पटी जळतरुपाषाणनिधिनिक्षेपसहित सेरीज हकदार व इनामदार करून इनाम अग्रहारम्हामत करून दिल्हा असे तरी तुम्हीं कसबे मजकूर पूर्व मर्यादेप्रमाण यांचे स्वाधीन करणें आणि इनाम यासि व यांचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेने सुरक्षित चालवणें साल दर साल ताजा सनदेचा उजूर न करणे या सनदेची नाखील लिहून घेऊन हे पत्र भोगवटियास परतोन देणें निदेश समज

रुजु
सुरु सूद बार

मर्या
देयं
राज
ते

लेखांक १८५ १४९२ ज्येष्ठ शुद्ध १

॥ स्वस्ति श्रीशके १४९२ वरीशे प्रवर्तमाने प्रमोद नाम संवछरे जेष्ट सुध प्रतीपदा सुक्रवार तदीनी माहाजर ऐसाजे बिहूजूर समस्त ब्राह्मसभा तथा राजमुद्राधीक्ष करून समस्त माहाजन का। अस्टे पाटोळयाचे

माहादो राम पेशवा राजश्री निसकराऊ
बळवतराऊ
कचो भास्कर मजमूदार सेकीन मौ॰
रामाजी माईदेव ठाणदार का।
जे कबज सीवनगी मामले विज्यापूर
अस्टे पाटोळेचे
सूरसेटी चौगला
वालो विस्वनाथ
तमीसेटी पफुणा
सोनजी पटेल पाटोळे
विठोबा धडी
कोमरसेटी सेटिया
जाखो मुरदेव मु॥ अस्टे
रुद्रोबा माहाजन
समस्त जन व ब्रह्मसभा व बाजे
तान्होबा कुलकर्णी
लोक माहाजन
केकदेभट बिन दामवणभट जोतीसी
वालवेकर जोतिषी
नरसीभट धर्माधिकरणी सिराले
विस्वनाथभट

केला माहाजर जे पोसीभट लाटीकर व वरिपाक्षभट वेदांती हे उभयवर्ग कोल्हापुरीचे ग्राम उपादीक समंधे झगडत दिवाणात आले तेथे पोसीभट लाटीकरे दिवाणात कतबा लिहून दिल्हे जे माध्यजन शाखेचे ग्रामउपाध्या रुद्र पाटकाच वडील वडील अनादसीध नेताती आपणासी वा माध्यजनशाखेचे उपाधिकीस समध नाही तरी आता रुद्र पाटकास व पोसीभट लाटीकरास अर्थअर्थ समंध नाही ऐसा निणयो जहाला त्यावरून समस्त जनाचे मनास आले जे चतुशाखेचे उपादिये वेगले माहाजर मोर्तब

तिमणभट गोटखिंडीकर
होनाबा तगाऱ्या
नरसीह पाटक उपाध्या अस्टे
मुदगलभट मलीभट
गोदोबा भालुवी
विस्वनाथभट दामवणभट
चंदोबा कुलकर्णी मौजे मनेराजुरी
गोविद पाठक
नारोपडीत बिन देवणा पडित
पंढरपूरकर

लेखांक १८६ १५५५ आषाढ शुद्ध १३

श्री

नकल

माहजर बखेरील छ ११ माहे मोहरम सुहूरसन अर्बा सलासीन अलफ बिहुजूर हाजीर मजालसीयानी अज माहाल पा। कोल्हापूर

| | | | |
|---|---|---|---|
| आगा अजम | गोविंदराम | माधो खंडेराव | देवजी कोनेरी |
| आगा सफदने | ठाणेदार | मजमूदार | दबीर |
| मगीवत | | | पार्थी सही |

सरगुन्हो व नाईकवाडीयानी

| | | | |
|---|---|---|---|
| वली इभराईम | जाखोजी नाईक | भिवजी जाधव | जाखोजी नाईक |
| सरगुन्हो | व रुकजी नाईक | नाईकवाडी | खावने |
| | सरनाईकवाडी | | |
| कृष्णाजी नाईक | बाहदूर अहमद | नागोजी नाईक | देठजी नाईक |
| व रेखोजी नाईक | नाईकवाडी | अदेक | |
| लवकरने | | | |
| भिकजी नाईक | सोनजी नाईक | चांदजी नाईक | नुर्दी माईक |
| पोवार | लवतुरे | टाकळकर | नाईकवाडी |
| सिंगोजी नाईक | सुरोबा हशमनीस | कृष्णाजी केरनेरी | नागोजी व ल |
| अहिरे | | नाडगौड | खोजी देसाई व |
| नदोबा देशकु | | | परमणा देसाई |
| लकर्णी कर्याती | | | का हवेली |
| हवेली | | | |
| कसबे कोल्हापूर | | | |
| सोमगौडा पटेल | वेंकटाद्री व हण | भिवजी पदरा रया | सांपणा माहाजन |
| का मजकूर | वजी कुलकर्णी | का मजकूर | होनजा होरा रया |
| सपशेटी शेटिया | का मजकूर | केसगुडा चौगुला | का मा। |
| केदारविड नेरली | बली नर्का रया | कावरस नाईक | दादोबा नाईक |
| रया का। मजकूर | का मजकूर | चाटे | मकमुदे चाटे |
| गदजी नाईक | कोनेरी नाईक | हसन नाईक चोर | सिवजी नाईक |

मुनमली का। सवासी गस्ती का। मजकूर चोरगस्ती का।
मजकूर रकोजी नाईक मजकूर
अंबाजी नाईक मुनमली का।
चोरगस्ती का। मजकूर
मजकूर नुर्या नाईक चोर-
गस्ती का। मजकूर

वैदीक

माधवाचार्य नारायणभट अष्टावधानी विठलभट जपे
नरसीहभट अग्नीहोत्री ग्रामउपाध्ये जनीभट दडगे

याहुजूर जाहाला माहाजर ऐसा जे ब्रह्मसभा श्री कपिलेश्वराचे देउळी धर्माधिकरणी यामध्ये व जोइसी यामध्यें बोलणें जाहाले. सबब मौजे पलुसकर कुलकर्णी वेव्हाराबदल का। मजकुरास आले होते त्यानिमित्य देवालई सभा करून समस्त ही बैसले होते. ते समई कुलकर्णी यानी आपलीं पत्रे दिधलीं ते वाचिली ते पत्रे पूर्वीपासून धर्माधिकरणी यापासी ठेवीत होते. ते निर्वाहपत्र धर्माधिकरणी लिहून देत होते. त्यावरी ते दिवशी जोइसी यानी ते पत्रे हिरोन घेतली होती त्यावरी धर्माधिकरणी बोलिले जे पूर्वीपासून वेव्हारपत्रे निर्वाह होय तोवरी आह्मापासीं ठेविताती. तैसें च ही पत्रे आह्मापासीं देणे आह्मी ठेऊन त्यास जोइसी बोलिले जे हे पत्रे आह्मापासी देणे आह्मी ठेऊन धर्माधिकरण आमचे ऐसे बोलोन का। मजकुरीचे कारकून तुह्मास बोलावितातीं ह्मणऊन जोइसीयांनी धर्माधिकरणीयास घेऊन का। मजकुरीचे चावडीस गेले. तेथे राजग्रहात तेथें राजग्रहात मौजे पलूसचे कुलकर्णी याची पत्रें ठेविली त्यावरी धर्माधिकरणी बोलिले जे साहेबी आपणापासी पत्रे द्यावी त्यास का। मजकुरीचे कारकून बोलिले जे उदियां तुमचा व जोइसीयांचा निवाडा करून पत्रें देऊन त्यावरी धर्माधिकरणी बोलिले जे जैसी हे पत्रे ठेविली तैसी च जोइसी मजकुराचे पंचाग ठेवणे. त्यावरी जोईसी मजकुराचे पंचागे व पलूसचे कुलकर्णीयाची पत्रे ऐसी दोनी ठेविली. त्यावरी जोइसीयास व धर्माधिकरणीयास उभयतांस राजग्रही बैसविले ते दाहा रोज १० बैसविले होते. तेथे काही मुनसिफी होऊन निवडले नाही त्यावरी हे खबर ठाणामध्यें मालूम जाहाली. मग जोइसी मजकुरास व धर्माधिकरणी मजकुरास बोलाऊन आणिले. त्यावरी हरदो जणापासून हारजितीचे कतबे घेऊन मुनसिफी का। मजकुरीचे पाटील याचे हवाला केली.

तेंही भीमारोळक्षुमीचे देवीचे देउळीं सभा करून बैसोन उभयतांचे बोलणे मनासी आणिलें
जोइसीयांनी

माधव पाठक लिंगणभट एकोंडीकर
कलभट माहेकर

यांसी बोलाऊन पुसिलें कीं धर्माधिकरण आमचे म्हणऊन बोलतां तरी धर्माधिकरण जोईसीयांचे कैसे ते सांगणे म्हणऊन समासदीं पुसिलें त्यावरी ते बोलिले जें आपणास धारा वृत्त पांच वृत्ती विष्णु पाठकें आपल्या मूळपुरुषास कन्यादानसमईं दिल्हेया आहेसी वृत्ती पाच बितां

| | |
|---|---|
| अंतर्गत देहे २ दोन | का कोल्हा |
| १ मौजे मायवडे | पूर जोतीप |
| १ उचगाव | व ग्रामउपा |
| —— | ध्रीक व धर्मा |
| २ | धिकरण ऐसे |
| | तीन |

ऐसे दान दिल्हे असेती म्हणऊन बोलिले त्यावरी समासद बोलिले कीं दानपत्र आणून दाखविणें त्यावरी जोइसी मजकूर बोलिले कीं रोज २ दोनीने दानपत्र आणून दाखऊन त्यावरी दोनी दिवसानी दानपत्राची तालीक आणून दाखविली असलपत्र नाही तालीक मात्र दाखविली व बोलिले जें गयाराम आपले मुतालीक त्यापासून धर्माधिकरण घेतले पद्म नामी भट धर्माधिकरणी बोलिलें जें आपलें धर्माधिकरण आपला मूळ पुरुष अच्युतभट त्याची स्त्री पोमाई त्यास ईश्वरभट सासरे तेंही आपले धर्माधिकरण कन्येस दिधले तेथीपासून धर्माधिकरण आपले वडीलांचे वडील खाव एतासी त्याहीमध्यें धर्माधिकरणाविषयीं परिकीय उभे राहिलें होतें त्यासी हि वेवाद सांगितला असे व आमचे वडीलीं गयाबळासी वेवाद सांगितला असे त्यावरी जोइसी मजकुराची साक्षी असे व जोइसी मजकुरांच तीर्थांत जोतीपाविषयीं वेव्हार जाहाला होता त्या पत्रावरी आमचे वडीलांची साक्षी असे व जोइसी मजकूर पांच वृत्ती आपल्या म्हणवाती तरी मौजे मायवडेचे जोतीष घेदांची खातातो व मौजे उचगांवीचे जोतीष मौजे माळवडेकर खातातो व ग्रामउपाधीक कठीकर खातातो व जोतीष पाठक व एकोंडीकर व माहेकर जोतीष खातातो व धर्माधि

असे. ऐसीयास दोनी तकरीरा करण माझी वृती आमचे आही बोलिले असे भक्षितों ह्मणऊन बोलिले
एणेप्रमाणे उभयतांचे बोलणे मनासी आणुऊन सभासद बोलिले कीं उभयताची मातृपक्षाची वृती ऐसें मनासी आणुऊन मग समस्त हि राजसभेस जाऊन आदि अत वर्तमान सागीतले. त्यावरी जोइसी मजकूर धर्माधिकरणास कथानी आपले ह्मणुऊन बोलत होतें गलथ धर्माधिकरणास जोइसी यास समंध नाही ऐसे निवडले. त्यावरी हारजितीचे कतबे घेतले होते. त्यास जोइसी मजकूर खोटे जाहाले ह्मणुऊन त्यापासून ताजील माल गुन्हेगारी होन ५०८ पनास घेतले व धर्माधिकरणी मजकूर खरे जाहाले त्यांपासून सीर्णी होन २५८ पचवीस घेतले सदरहूप्रमाणे निवाडा जाहाला. पदमनाभीभट बिन मुदगलभट धर्माधिकरणी व समस्त गोत्रज धर्माधिकरणी याची मिरासी धर्माधिकरण का। मजकुरीचे खात येताती तैसें च त्याची मिरासी खरी असे. जोइसी मजकुरास धर्माधिकरणाविपयीं सवंध नाहीं. धर्माधिकरण पदमनाभीभट बिन मुदगलभट याचे व याचे गोत्रज त्याची मिरासी लेंकराचे लेकरी खाऊन सुखे असावे. हा माहजर सही.

गोही

| | |
|---|---|
| १ बापूभट हैदले | नरसींभट पुराणीक |
| रामा पाध्ये | लक्षुभट जमाखिडी |
| गंगाधरभट पुराणीक कोपरगाव | वेंकडभट श्रीवत्स |
| बंडभट गोडबोले | बापूभट वाळवडेकर |
| कृष्णंभट भरणे | नरसींभट जपे |
| जनीभट ढवळीकर | मुदगलभट देव |
| मादिवभट उरुणकर | |

---

लेखांक १८७ १५९१ चैत्र वद्य ३

श्रीमाहालक्ष्मैनमः

स्वति श्री शके १५९१ वर्षे सौम्य नाम सवत्सर चैत्रवदि तृतीया तदिनी करवीरक्षेत्री राजश्री गोविंदराव दतात्रयानी प्रतिग्रहा प्रताप येक प्रमाणे वाटणी केली असे स्वस्ताक्षर धर्माधिकारी महिपतिभट्ट

१ महिधराचार्य
१ आवका
१ गोदावरी
१ नागायि
१ माधवाचार्य
१ गणेशाचार्य
१ कृष्णभट्ट जम
१ गंगायि काग
१ लक्ष्मणभट्ट ज
१ मानिभट्ट पुरा
१ नरसीभट्ट पु
१ तिमण० कर्त
१ यार्क्‍मभ्ट कर्ते
१—नरह० घ
१ महादेभट्ट घ
१ जक्षिभट्ट ढव
१ जनिभट्ट ढव
१ महिपतिभट्ट घ
१ तिंगण घर्मा
१ तमण० पुजा
१ मुकण० पुजा
१ कृष्णोबा पुजा
१ पारायि अव
१ नारोबा पुजा
१ कमाजि पुजा
१ हरि० पुजारि
१ तिमाराम गद
१ आनंदभट्ट ब
१ नुकण० अपे
१ नारायणभट्ट को
१ महादेवभट्ट सोधि
१ विठलभट्ट जरे
१ नगायि मुरग
१ नामायि मुरगो
१ विश्वनाथ० ज
१ बाळभट्ट गोशी
१ वेंकटभट्ट वरुण
१ भिकारभट्ट पेत
१ नाराय० अवठे
१ चिमणभट्ट अवे
१ येवपाभट्ट भ
१ महादेवभट्ट अथे
१ नरसीभट्ट अद्याव
१ अपदेभट्ट अद्याव
१ पारायि जनार्दन
१ कृष्णंभट्ट चंद्रिका
१ काशिभट्ट अम
१ लिंगणभट्ट
१ बाळायि गो
१ अमणाभट्ट म
१ लक्ष्मण० लाटि
१ सरस्वतिभट्ट ला
१ रामभट्ट दंडिगे
१ नरवा कोकणा
१ बाळा को
१ येदायि लाटिक
१ लक्ष्मण० अभ्या
१ कृष्णभट्ट देव
१ शिवभट्ट सवरा
१ रामभट्ट गद्दे
१ बापुभट्ट हेदळे
१ नरसिभट्ट दांडि

१ तिमाजि पुजा पां
१ नरहरिभट्ट डोरड
१ घारंभट्ट अध्या
१ शंकरभट्ट क्रमित
१ घोंडिभट्ट कर्ते
१ विश्वना० दंडिगे
१ विश्वना० उडणे
१ नरहरिभट्ट उड
१ दासभट्ट घल
१ नारायण घल
१ तमणभट्ट घल
१ देवणभट्ट देवले
१ शेषभट्ट देवले
१ वडंभट्ट
१ विश्वनाथभट्ट द
१ भानिभट्ट दड
१ नरहरि गोसे
१ नरसिभट्ट अग्न
१ तिमणभट्ट लाटि
१ नारायण० कविठे
१ वडेभट्ट जेरे
१ हरिभट्ट केसापु
१ मादेभट्ट वडकटपे
१ केशव पुजारि
१ मठ ———
१ भिकारभट्ट वल
१ नाराय ढवलि
१ महादेव जम
१ हरिभट्ट जम
१ नाराय० जमखि
१ गंगाधर पुराणि
१ नरसिभट्ट मा
१ अतिभट्ट दडि
१ रामभट्ट दडि
१ बापूभट्ट दडि
१ वेडभट्ट गाडवा
१ नरसिंभट्ट धर्मा
१ पद्मना० धर्मांत
१ खडिभट्ट धर्मा
१ देवपाभट्ट देव
१ नरसिंभट्ट देवल
१ राम पाठक
१ तुक पाठक
१ माहाद पाठक
१ कृष्ण पाठकसा
१ भिकारभट्ट मुड
१ तुकणभट्ट पेत
१ तुक पाठकजो
१ नरस पाठक
१ नागदेभट्ट ढवली
१ देवणभट्ट ढवली
१ रामाराध्ये
१ देवणभट्ट अष्ट
१ तमण लाटिकर
१ गवतुभट्ट माल
१ देवणभट्ट कारवे
१ गणेशभट्ट स्मार्त
१ जखिभट्ट स्मार्त
१ कलभट्ट जोसी
१ तुकणभट्ट का
१ जयराम वालवे
१ माहादेवभट्ट किचा

१ रामकृष्णभट्ट पुरा
१ धुमभट्ट फुफेकर
१ माहदेवभट्ट उरण
१ सखिभट्ट जटापा
१ नरशिभट्ट गिधी
१ गोविंदभट्ट पुरा
१ कृष्ण पाठक यपपा
१ शपाठक दानी
१ विष्णु कुणके
१ काशिभट्ट गुण्य
१ लक्ष्मणभट्ट गुळो
१ बालकृष्णभट्ट छा
१ गोशिभट्ट छाटिक
१ नरशिभट्ट काटि
१ शमुभट्ट ख़ुचा
१ त्रिमण भट्ट खय
१ देवणभट्ट छाटिक
१ विश्वनाथ पाठ
१ रुद्र पाठक
१ नरशिभट्ट सपे
१ अंतिभट्ट सपे
१ माथि जपी
१ महादेभट्ट ज
१ विश्वनाथ धर्मा
१ अच्युतभट्ट घ
१ छींगण जो
१ हरिभट्ट जोशी
१ शंकर जोशि
१ विष्णुभट्ट पर
१ तुकणभट्ट पं
१ हरिभट्ट अध्यापक
१ आथायिकी
१ कोडिभट्ट अध्या
१ भिकारभट्ट अ
१ नरसिंभट्ट अध्या
१ योमायि किशी
१ नरसिभट्ट थाळ
१ कृष्णभट्ट थाळये
१ काशिभट्ट कान
१ रामभट्ट छटिक
१ कृष्णभट्ट मग
१ मलभट्ट काणव
१ विश्वनाथ० का
१ नरशि गयावळ
१ नरशिभट्ट भिर
१ निमण० मीठ
१ रेमणाभट्ट जोशि
१ गुकण० जोशि
१ नारायणभट्ट ला
१ काशि जोशि
१ शंकरभट्ट पोते
१ विश्वनाथभट्ट ना
१ देवेंद्र मारतिम
१ अंतिभट्ट अम
१ शंकरभट्ट वेदावि
१ रामभट्ट वेदावि
१ धर्माधिकारि अग्रामी

१ जखिभट्ट क
१ रणछोडी
१ नारोबा काला
१ नारायणाचार्य

---

लेखांक १८८ १६२५ अधिक श्रावण शुद्ध ११

( फारसी मजकूर )



इजत असार आमीलानि ता तारले पा कोलापूर सुासन १११३ मालूम नुमायंद मुकुंद नारायण सरदेशमुख पा मजकूरयाचे हक अमानत मणुन पेसजी भिसली जाहली होती तरी हली देसाई मजकुरावरी नजर एनायत फर्माऊन याचे हक व विस्वा सायर व गला वदस्तूर साविक सुधामत चालिले आहे तेणेप्रमाणे दुमाला करणे दरीबाब ताकीद असल नकल लेहून तालीक परतून दीजे रा छ ९ रबिलोवल



---

लेखांक १८९ १६४४ आषाढ वद्य ९

तालीक श्रीशंकर

श्रीमत्परमहंसादियथोक्ताबिरदांकित श्रींगेरीसिंव्हासनाधीस्वर श्रीमत्छकराच्यार्यान्वयसंज्यात अभिनव श्रीविद्यानरसींहभारतीस्वामी

॥ॐ॥ सकलगुणालंकरण हरिगुरुभक्तपरायण राजमान्य राजश्री समस्त ब्रह्मवृंद व ज्योतिसी व उपाध्ये व धर्माधिकारी व आश्रित व राजकीय ग्रहस्त व मुद्राधारी व देशाधिकारी व देशकुलकर्णी व ग्रामस्त कुलकर्णी वास्तव्य क्षेत्र करवीर व सदलगे व कुरुंदवाड व प्रा कागल व इत्यादिक क्षेत्रवासी परमभक्तोतम याप्रति आसीर्वाद उपरी वेदमूर्ति सदासिवभट बिन जायभट ज्योतिसी मौजे पटण–कोडोली याच पित्रीचे भीमभट ज्योतीसी मौजे वसगडकर काळवसे देवाज्ञा जाहाली याजवरी त्याची स्त्री

आपळ माहेरी मायबापापाशी होती त्यास प्राक्तनवश्कार काळगतीने वदिम गोसावी याच यासीस प्रवेश्यून सदस भ्रस्ट जाहाली या लांछनास्तव नअकर्म लौप्य होते ऐस चितात अनुताप भरून ते भ्रस्ट बाइको व सदाशीवभट बिन जायभट ज्ञातीसमवेत भाद्रापाशी मठ करवीर क्षेत्राशी आले त्यांवरून त्या बायकोचा शोध करिता मस्तुत तिच दायाद भ्रस्टत्वाचा विचार सागत होत ते मतक्षे अवलोकन केलिआवरून तीस प्रियार पुसिली परतु ते मागती आपल्या यातीत रिघाप्या मान्य नाही ऐस कृतनिस्चय तीस विचारेन ते बाईकोचा सदाशिव भटानी घटस्पोट करून धान्यनिषय विधियुक्त त्याग विधी कम संपादऊन तीर्थप्रसाद देऊन पंक्तिपावन करून शुध केले असेती तरी सदाशिवभट बिन जायभट व याच समस्त दायाद याचे अही अनो दकसंसर्ग करीत जाणे सुशाप्रती विषेश काय लिहिणे शके १६४४ सर्ये शुभकृतनाम संवत्सरे अशांड वहुळ नवमी भौमवासरे उर्फ छ २२ माहे रमजान मोर्तब सूद

---

लेखांक १९०

१६४८ मार्गशीर्ष वद्य ७



( फारसी मजकूर )

मुतसदियानी मोहिमात हाल व इस्तकबाल देशमुखानि व देशपांडे व मोक दमानि व रैयां व मुजारयानी परगणे हुकेरी सरकार रायबाग सुभेदारल अफ्र बिजापूर सन ११३६ चिदानंद दरविसा मौजे चिंचवाड हवली परगणे मजकूर दरोबस्त इनाम बनाम बमाम प्रुनारदारानि साकीन कोळा पूर बसवुक फरक मुबारक हजरत मोकरर करून दिल्हे असे बुमाळा करून देणे माशारनिले तेथील माहासूल समय अवलाद अहफाद सरफ महशीयत करोन दुवा गोई दवाम दौलत अयदपैवद मशगुल राहातील कुल्याव कुलकानू माफ केले असे मुजाहीम व होणे दरीबाब ताकीद दानंद मोर्तब शूद छ २० माहे रबिलाखर

---

लेखांक १९१ — १६१८ वैशाख शुद्ध १२

श्री

राजश्री हवालदार व कारकून ता। वाडें गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो। नारो दामोदर सुभेदार व कारकुन सुभा प्रांत जुनर सु॥ सीत तिसैन अलफ राजश्री पंतसचीव स्वामींचे आज्ञापत्र छ १६ साबानीचे पौ जाले तेथे आज्ञा की वेदमूर्ती राजश्री रामज्योतिषी मौजे बोरगाव ता। हवेली सुभा दाभोल ब्राह्मण योग्य आहेती. स्नानसंध्या करून माहाराज राजश्री स्वामीस आशीर्वाद देताती यांचा योगक्षेम चालिला पाहिजे राजगृहीहून अन्न पावोन स्नानसंध्या करून सुखरूप राहिले या राजश्री स आशीर्वाद देतील येणेकरून राज्याचे कल्याण आहे हे जाणुन वेमुर्तीस मौजे तोरणे ता। मा। नुतन इनाम देह १ कुलबाब कुलकानु निधि निक्षेप जळतरुपाषाण सहित पडिलेपान खेरीज हकदार इनामदार करून दिल्हा आहे तरी मौजे मा। ज्योतीषी याचे स्वाधीन करून यास व यांचे पुत्रपौत्रादि वौंशपरंपरेने चालवणे ह्मणुन आज्ञा आज्ञेवरून वेदमूर्तीस नूतन इनाम मौजे मा। कुलबाब कुलकानु निधिनिक्षेप जलतरुपाषाण पडिलेपान खेरीज हकदार इनामदार करून दिल्हा आहे तरी मौजे मा। वेदमूर्ती ज्योतिषी याचे दुमाला करून यास व याचे वौंशपरंपरेने इनाम चालवीत जाणे प्रतीवर्षी नूतन पत्राची आपेक्षा न करणे प्रती लेहून घेऊन मुख्य पत्र भोगवटेयानिमित्य ज्योतिषी याजवळ परतोन देणे रा। छ १० शौवाल मोर्तब सूध

मोर्तब सुद

० श्री
दामोदरा
त्मज नाराय
णस्यैपा
मुद्रा

---

लेखांक १९२ — १६१८ वद्य ९

श्री

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्य राजश्री नारो दामोदर सुभेदार व कारकुन प्रात जुनर गोसावी यांसि

सेवक शंकराजी नारायण सचीव नमस्कार स्वा सवा विनंत अशफ राजश्री रामजोशी बोरगांवकर याणी हुजूर येऊन विदित केले की मौजे बोरणे तर्फ वाडे हा गाव आपणास इनाम दिल्हा आहे त्यास कारकून वाजे सनदेचा उजूर करितात तरी साल मजकुराकारणे ताना ताकीद रोखा दिल्हा पाहिजे म्हणवुन विदित केले तरी पेशजी इनामाची सनद सादर आहे त्या प्रमाणे गाव हुमाले करून इनाम चालवणे दरवर गाव वाजे सनदेचा उजूर न करणे छ २२ जमादिलाखर पा हुजूर

(माले य छलना वधि)

---

लेखांक १९३ १६२० आषाढ शुद्ध ९

श्रीरामवरद

राजश्री रामाजी पताजी हवालदार व कारकून वर्त
मान व भावी ता चीपुळण गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य

सेवोंकित माहादाजी मल्हाल समासद नामजाद व कारकुन सुभा मामले दामोल नमस्कार अनुक्रमे आशीर्वाद सुहुरसन तीसा तीसैन अलफ बदल देणे इनामती वेदमूर्ती राजश्री रामजोशी बिन बगाल जोशी गोत्र शांडिल्य सुत्र अस्वलायन वास्तव्य बोरगांव ता हवेली प्रात मजकूर या सनद राजश्री छत्रपती स्वामी राज्याभीषक शक २५ बहुधान्य नाम संवछरे आस्वीन शुध षस्टी भृगुवासर छ ५ माहे रबीलाखर पो छ १ जमादिलावल सेथे आज्ञा जे वेदमूर्ती मशुव मले थोर विद्यावंत आपलि स्नानसंध्यादीक सद्कर्माचरण करून आहे ते याणी स्वामीसमीप सातारांचे मुकामी येऊन विदित केले की आपणास धर्मादायाची मोईन आहे ते धामधुमीच्या प्रसंगाकरिता मोईन प्रमाणे पावत नाही या करिता आपला योगक्षेम चालत नाही तरी स्वामींनी आपणास नुतन इनाम जमीन उतरोत्तर चालविले पाहिजे म्हणजे त्याची कीर्दी करून उत्पन होईल ते भक्षुन स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण चिंतोन आपलि स्नानसंध्या करून राहोन म्हणोन त्यावरून मनास आणीता वेदमूर्ती मले शीस्ट याचे चालविणे

हे स्वामीस अगत्य ह्मणोन वेदमूर्ती वरी संतोशी होऊन धर्मादायाची मोईन होती ते दूर करून नुतन इनाम दाभोलि लारि ३०० तीनसे याचा वदल

| | |
|---|---|
| कीर्दी जमीन वदल मजकुरी पैकी लारि पन्नास ५० | पड जमीन दाभोलि लारि अडीचसे २५० |

लारि गावगना

| | | | |
|---|---|---|---|
| मौजे चिवेलि ता हवेलि लारि १५० | | मौजे बोरगाव ता हवेलि दाभोलि लारि १५० | |
| कीर्द साल मजकूर लारि २५ | पडजमीन लारि १२५ | कीर्द साल मजकूर लारि २५ | पडजमीन लारि १२५ |

एकून तीनसे लारीची जमीन कुलबाव कुलकानु हालि पटी व पेस्तर पटी सहीत खेरीज हकदार करून दिल्हे असे तरी राजश्री अनाजीपंताचे जमीनीस धारा व गलियासी निर्ख आहे त्याप्रमाणे सदरहु जमीन नेमुन चतु:सीमा करून देऊन उतरोतर वेदमूर्तीस व वेदमूर्तीचे पुत्रपौत्रादि वंशपरपरेस चालवीत जाणे नवीन पत्राचा अक्षेप प्रतीवर्षी करीत नव जाणे या पत्राची तालिक लेहून घेउन असल पत्र परतुन भोगवटीयासी वेदमूर्तीजवल देणे येणेप्रमाणे राजश्री पंतअमात्य व राजश्री श्रीकराचार्य पंडितराव याच्या सनदा सदरहु प्रमाणे सादर जाह्ले आहेत या नेमणुकेप्रमाणे वेदमूर्तीस भुमी नेमून द्यावे ऐसीयासि वेदमूर्तीस कीर्दी करावयावदल अनकुल पडिले तेथे सुभातुन दीधलि लारि ३००

| | |
|---|---|
| ता हवेलि लारि | तर्फ मजकूर लारि |
| | ६८। |

येणे प्रमाणे भूमि नेमून दिली आहे. त्यास मौजे चिचघरी ता मजकूर भातसेताची पडी जमीन वृतीस कीर्दी करावयाबदल दिधली असे; सेते पेस्तरसालाकारणे बितपसील.

| | | | |
|---|---|---|---|
| सेत रेडेखरी चतुसीमा | | सेत कलबखरी बा कासाद चतुसीमा | |
| पूर्वेस भाटले नजीक नदी | पच्यमेस सेत कलबखरी बा देव | पूर्वेस सेत कलबखरी देव | पच्यमेस सेत कलबखरी डोगर |
| उत्तरेस परीख | दक्षणेश सेत बोरखरी | उत्तरेस दरिया वाहाल | दक्षिणेस पाणदीचे भाटले |

याची मोजणी

अर्ज तूळ

१४ ४४

२४

१७

—

५५

विजाई

१८॥

एकून जमीन पोळी ८१४ एकून

विघे

८२८॥।

प्रती

८॥ अवल

८॥ दूम

८॥ ॥। सीम

८॥ चारसीम

———

८२८॥

सेत कानई पाळपासोंबा नजीक घर

तूळ अर्ज

१३ ५

———

६५ एकून

जमीन

८८३।

चारसीम

याची मोजणी

८॥४॥ किता

१७ १७

———

२८९

८२।१। किता

तूळ अर्ज

४२ २२

२७

१७

—

६६

विजाई

२२

———

१२४

८३८॥।

प्रती

८॥ अवल

८॥ दूम

८१ सीम

८।८॥ चारसीम

——

८३८॥।

तेरीज एकदर जमीन

| | जमीन विघे | अवल | दूम | सीम | चा॥ |
|---|---|---|---|---|---|
| सेत केरेसरी | ८२८॥। | ८॥ | ८॥ | ८॥ ॥। | ८॥ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सेत कलवतारी | ३॥ | ॥ | ॥ | १ | १०॥' |
| कोरडे पावाल | ३। | ० | ० | ० | ३। |
| पो चोरा | ——— | —— | —— | ——— | ——— |
| | ५०॥ | १ | १ | १॥.॥ | १॥४ |

एकून आकार नात दाभोळी सडी
१। असल १ दर १।
१ हूम
१०॥४ घीम १॥'॥ दर '॥ १
१,१। चारखीमा १॥४ दर ॥॥

———

४॥'॥
॥२ हकदार
४॥'॥६

एकून सेते ठिकाणं तीन एकून जमीन पाच बिघे पावणे पाच पांड. यासि धारा देसील हकदार पावणे पाच खंडी, चौदा सेर, रास. वजा माहाली वसूल घेणे. हकदारी गल्ला साडेचार मण दोन सेर. बाकी गल्ला ४॥.॥४ साडे चार खंडी, सात पावली, रास. याची किमती दरखंडीस निमे लारी १५ पंधराप्रमाणे दाभोळी लारी ६८। सवा अडसष्ट लारीची वृत्ती तर्फ मजकूर पैकी नेमून दिल्ही असे. तुम्ही वेदमूर्तीचे स्वाधीन करणे. कीर्द करून उपभोग करितील. यासी व याचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरा चालवणे. नवीन पत्राचा आक्षेप सालदरसाल करीत नव जाणे. या पत्राची तालीक घेऊन अस्सल पत्र वेदमूर्तीजवळ परतून भोगवटीयासी देणे. छ ७ मोहर(म) मोर्तब सूद

लेखनाव
विसुदा वि
राजते

दयालादवती
णीयः पुत्राणमपरा
यण ॥ महादेवस्य
मुद्रेयं जनो जाय
तु सौख्यदा

लेखांक १९४ १६४३ माघ शुद्ध १

श्री




स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४८ प्लव सवस्तरे माघ शुध प्रतीपदा रवीवासरे क्षेत्रीयकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी वेदमूर्ती रा। रामजोसी बिन बाळ जोशी वास्तव्य मौजे बोरगाव ता। हवेली प्रा। दाभोळ यास दिल्हे इनामपत्र ऐसे जे







तुम्ही किले सातान्याचे मुकामी स्वामीसंनीध येऊन विनती केली की मौजे सोरपे ता। वाडे प्रा। जुनर हा गाव पूर्वीपासून आपणास इनाम आहे आपण उपभोग करीत आलो मध्ये अघतारामुळे व आपण माहायात्रेस गेलो यामुळे इनामगावचा भोगवठा राहिला आहे तर स्वामीनी कृपाळु होऊन मौजे मजकूर पूर्ववत इनाम चालवावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणोन विदित केले व पूर्वील पत्रे दाखविली त्यावरून मनास आणिता तुह्मी बहुत थोर जोतिषी सत्पात्र विद्यावत यास निमित्य स्वामी तुह्मावरी कृपाळु होऊन मौजे मजकूर कुलबाब कुलकानु देखील हालिपटी व पेस्तरपटी इनाम करार करून दिल्हा आहे तर तुह्मी मौजे मजकूरचा उपभोग पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने करून स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चितुन सुखरूप राहणे

लेखनालंकार




रुजुसुरनवीस सा। मंत्री
बारसुद सुरसुद धार

---

लेखांक १९५ १६४३ माघ वद्य १२

श्री




आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरधर वीस्वासनीधी राजमान्य राजश्री बाजीराऊ पडित प्रधान ता। मोकदम मौजे तोरणे ता। वाडे प्रात जुनर सु॥ ईसने अशरीन मया अलफ मौजे मजकूर पुर्वीपासुन वेदमूर्ती राजश्री रामजोसी बिन बालजोसी वास्तव्य मौजे बोरगाव ता। हवेलि प्रात दाभोळ यांसि इनाम आहे तेणेप्रमाणे हालि करार केला आहे तरी वेदमूर्तीसी रुजु होऊन मौजे मजकूरचा वसूल याजकडे देत जाणे प्रतीवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणे मौजे मजकूर यासि व याचे पुत्रपौत्रादी वंशपरपरेने चालवीत जाणे या पत्राची प्रती लेहोन घेऊन मुख्य पत्र याजवलि भोगवटेयास परतोन देणे छ २५ रबीलाखर आज्ञा प्रमाण




---

लेखांक १९६ १६४४ अधीक श्रावण शुद्ध ८

श्री




मा। अनाम देशमुख व देशपांडिये ता। वाडे सरकार जुनर यासि बाजीराव बलाल प्रधान सु॥ सलास अशरीन मया व अलफ मौजे तारणे बु॥ हा गाव वेदमूर्ती राजश्री रामजोसी वास्तव्य मौजे बोरगाव ता। हवेलि मामले दाभोल यास पूर्वीपासून कुलबाब कुलकानु जलतरुपाषाणनिधी-

निक्षेप चतुःसीमा खेरीज हकदार व इनामदार देखील हालिपटी व पेस्तरपटी इनाम आहे त्याप्रमाणे हालि करार केला असे तरी तुम्ही मौजे मजकूर वेदमूर्तींस पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणे प्रतिवर्षी नुतन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची नकल लेहुन घेऊन असल पत्र भोगवटीयास वेदमूर्तीजवळ परतोन देणे जाणिजे छ ११ सौवाल पा। हुजूर

मोर्तब सूद

बार

---

श्री

लेखांक १९७ १६४४ भाद्रपद शुद्ध १३

स्वस्ति श्री राज्याभिषेकशके ४९ शुभकृतनाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध त्रयोदसी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभू छत्रपति स्वामी याणी देशमुख व देशपांडे ता। पाली यांसि आज्ञा केली ऐसी जे राजश्री महादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण उपनाम जोशी गोत्र शांडिल्य सूत्र आश्वलायन हे स्वामीचे पुरातन सेवक तीर्थरूप राजश्री थोरले कैलासवासी स्वामीपासून बहुत निष्ठेनें सेवा केली व तीर्थस्वरूप राजश्री संभाजी राजे काका यांची सेवा केली व त्याउपरी तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी चंजीस असतां तांप्रार्चे संकट प्राप्त जाहालें ते समयीं माहादाजी कृष्ण हे संताजी घोरपडे व आधवरायांसमवेत फौजा घेउनु गेले ते समयीं विशेषात्कारें सेवा केली याकरितां यांवरी राजश्री कैलासवासी स्वामी कृपाळू होऊन चंजीचे मुकामीं यासी मौजे सवली ता। पाली प्रां। मजकूर हा गांव कुलबाब कुलकानू खेरीज हकदार व इनामदार करून जलतरुपाशाणनिधिनिक्षेपसहित हालीपटी व पेस्तरपटी देखील इनाम अजरामऱ्हामत देउनु सनद दिल्हा त्यावरि मारनिलेनीं व त्याचे पुत्र राजश्री बाळाजी महादेव यानीं राजश्री शिवाजी

श्री शंभु छत्र पति हर्षनिधान रघुनाथसुत तिमाजी पंडित मुख्य प्रधान

श्री ॥ श्री आ दि पुरुष श्री राजा शंभु छत्रपती स्वा मी कृपानीधी तस्य कृष्णाजी परशरा म प्रतिनीधी

राजे दाजी याची सेवा केली. त्यावरून स्वामींनीं हि मौजे मजकूर यांसि इनाम चालवावयाची आज्ञा करून पो दिल्ही. त्या प्रमाणें गाव यास इनाम चालत च आहे. ऐशास, महादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण व बाळाजी महादेव व रामचंद्र महादेव व कृष्णाजी महादेव हे स्वामीचे एकनिष्ठ सेवक, यामध्यें बाळाजी महादेव यांणी वडिलवडिलांपासून स्वामीची सेवा एकनिष्ठेनें केली व हाली करित आहेत. याचें चालविणें स्वामीस अगत्य, याकरितां तीर्थरूप राजश्री        कैलासवासी स्वामींनीं मौजे सवली हा गाव चंदीचे मुक्कामीं महादाजी कृष्ण यास इनाम वंशपरंपरेनें दिल्हाप्रमाणें स्वामींनींहि चालवावयाची आज्ञा केली असे. तरी, यास मौजे मजकूर पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें इनाम चालवणें. या पत्राची प्रती लिहून घेउनु अस्सलपत्र भोगवटियास याजवळ परतोन देणें. निदेशसमक्ष




रुजू.
सुरु सुद बार

---

लेखांक १९८ — १६५१ कार्तिक शुद्ध ६

श्री




आज्ञापत्र राजश्री पंत प्रधान ताहा मोकदमानी व रयान मौजे मोहू ता वाजे रा कल्याण सुा सलासीन मया व अलफ. मौजे मजकूर पेपजीच्या मोकासियाकडून दूर करून हालीं राजश्री बालाजी माहादेव यास मुकासा दिल्हा आहे. तरी तुह्मीं यांधी रुजू होऊन मौजेमजकुरीं कीर्द अबादानी

१ पत्र सलासीनातले असून त्यावर बालाजी विश्वनाथाचा शिक्का आहे. बाजीरावाचा शिक्का हवा होता.

करून हातांतील खड्गानें त्याचें शीर कापलें आणि त्याचे सर्व चोप्यांचें मुंडके कापून त्याचे वदला आम्ही घेऊन आम्ही राज्य घेऊन राज्य करू लागलो; तेव्हां पासोन तुमें नांवानें आम्ही वर्दू म्हणोन देवीस मागोन घेतले, तेव्हां पासोन आम्ही निंबाळकर म्हणून नाम चालविलें आम्ही मूळचें धारचे पवार आहो हें वर्तमान मोंगल पातशहा येदर म्हाव कोणी कळवीलें वरून त्याणें येथें येऊन आमचे राज्य जप्त करून आपलें ठाणें बसवीलें, आणि वेदरास कैद करून नेले, तेथें आम्ही एक वर्ष कैदेंत होतो तेथील अमीर ऊमराव मध्यें घालोन मोंगलाची धाव पचरा लक्ष १५०००० एक शीका मोंगलांची धाव मरून आमची जहागीरी सोडवीली, हा तुमचा मोठा उपकार म्हणोन तुम्हांस "धावे पतगराव" ही कीताबत नवीन बवन् करून दिले आहे ते ——

मी श्रुघु देवाची पूजा मी तुम्हास दिली त्यावंश्याने येथ भक्त आई येतील त्यांचे नवसाचे सोनें मोतीं व रुपें वर्गे व जनावरें—बैल, हैस, घोडा, गाय वगैरे उत्पन्न येईल ते तुम्ही घ्यावें, बगडाचें जें उत्पन्न येईल तें तुम्ही घ्यावें व देवापाशीं नक्त पैसे येतील ते तुम्ही घ्यावे, व बगडागळाचें सामान तुम्ही ठेऊन गळ टोचून बगडा तुम्ही भव करावे; तेथील पान व मुळवटी मरून तुम्ही घ्यावे श्रंकराचें पावतका ( पादुका ) पाशीं उत्पन्न येईल तें पवयानी घ्यावें पोपाख वगैरे सामान तुमचे स्वाधीन देव तुमचा आणि तुम्ही देवाचे पुजारी यांत कोणाचा संबंध नाहीं देवास पांघरूणबिरगुट वगैरे पोपाख येईल तो तुमचा, शीवाय च्यार चाहूर जमीन देवानजीक बिरादेंत तुम्हांस मिरास करून दिली आहे; व परगणें फलटण येथें दोन चाहूर इनाम करून दिली आहे त्या प्रमाणें ते दोन चाहूर तुमचे तुमाला करतील, व भीमीबाई देवीची तुमचे मार्फत पुज्या अर्च्या तुम्ही करावी, व नवसाच्या परज्या तुम्ही आपले हाते सोडवाव्या त्या प्रकर्णी जें उत्पन्न येईल तें तुम्ही घ्यावें, याशिवाय आमचे तोफखान्याचे रुपये पारखण्याची पोत दारीचे वतन तुम्हास दिले आहे खांडवा, घाटी, पानवीडा समाचा तुम्हास माफ व पोतदारकीबद्दल मुशाहीऱ्या ऐवजी गावगन्ना उत्पन्न नक्त गावगन्ना पत्र करून दिले आहे,

दरसाल तुह्मास बिनहरकत देण्याची गांवगन्ना ताकीद निराळी दिली आहे; त्याप्रमाणे तुह्मास पावत जाईल. तो अकडा खालीं नमुद केला आहे तो गांववार—

| | | | |
|---|---|---|---|
| १० परगणे फलटण | ९ मौजे असू | ९ मौजे तरडगांव | ८ मौजे नांदल |
| ८ मौजे हिंगणगाव | ८ साखवड | ७ अदरकी बुद्रुक | ५ अदरकी खुर्द |
| ६ सालपे | ५ तांबवे | ४ कांपडगाव | ४ कोरेंगांव |
| ५ पाडेगाव | ७ होळई | ४ मुरुम | ४ खामगाव |
| ७ जिंती | ४ रावडी बु. | ४ रावडी खु. | ४ कुसूर |
| ४ तडवळे | ४ काळज | ७ वाठार | ३ मलवडी |
| ४ सुरवडी | ५ निंभोरे | ३ भीलकटी | २ वडजल |
| ४ मीरगांव | ६ बीबी | २ खडकी | ४ कोऱ्हाळे |
| ८ ढवळ | ६ ताथवडे | ७ वाखरी | ४ वडगाव |
| ३ वाघुशी | ४ तरडफ | ५ दालवडी | ३ मांडवखडक |
| ५ उपाळे | ३ वेळोशी | २ तावडी | ३ विंचुरणी |
| ३ कुरवली खु. | २शेरीझीरपवाडी | २ भाडळी खु. | ३ भाडळी बु. |
| ८ बेडणी | ५ निरगुडी | ४ सासकल | ५ दुधेबावी |
| ४ तीरकवाडी | ४ सोनवडी बु. | ३ सोनवडी खु. | ५ वडले |
| २ शेरीनिंबळक | ७ निंबळक | ६ बरड | ५ पिंपरद |
| २ टाकळवाडे | ४ राजाळे | ४ साटे | ५ सरडे |
| ५ गोखळी | ५ राजुरी | ५ मुजवडी | ५ जावली |
| ४ कुरवली खु. | ४ अंदरुड | ४ सांगवी | ४ सोमथळी |
| ५ गुणवरे | ४ मीरढे | २ कोपरडे | ४ कापशी |
| ४ अळजापुर | ६ गीरवी | ४ सोनगाव | ५ खुटे |

येणेंप्रमाणे गांवगन्ना नक्त मुशाहीरा इतका करून दिला तो दरसाल मिळेल; व आमचे घरी कार्य प्रयोजन वगैरे होईल तर दोन असामीचा सिधा तुह्मास मिळेल. बाबासाहेब व आबासाहेब यांचे दोन उत्सवांत एकाचे दोन नारळ तुह्मास मिळतील. याप्रमाणें उत्पन्न तुह्मास करून दिले आहे ते तुह्मी आपले वंशपरंपरा लेकरानलेकरी अनभवुन सुखरुप रहाणें. यास कोणी आमचे वंशीक मना करतील तर त्यास श्री निमजाई

देवीची शफथ आहे व तो आमचे वंशाचा नाहीं यास कोणीही हरक करील त्यास काशी वाराणशीं हेर केल्याचे पातक होईल. अगर कोण मुसलमान हरकत करील त्यास पीराची शफथ आहे दरसाल पथाप आशंका न घेता या पत्रावर दरसाल वहीवाट करावी असी दमदारी कर ठेविली आहे. आणिखे छ १ माहे रमजान मोर्तब सूद

लेखांक २७६ ९४७ ज्येष्ठ शुद्ध १०

श्री

असल बमोजीब नकल नकलेची नकल

तांब्याच्या पत्राची नकल असलाप्रा सोधून लिहिली आसे

मिरासपत्र तांब्याचे शके ९४७ आनंद नाम संवछरे जेष्ट सुध दशमी सुक्रवार ते दिवसी लिहिले ऐसे जे मौजे दिये प्रा पुणे येथील मोकदमीचे वतन पीडनाईक कंठराऊ चव्हाण याचें वतन करार आसे काल कम यासी कोण्ही हिक हरकत करील त्याच्या वडीलावरी गधा गाढव आसे ऐसा कुपाया आसता करीना आला आपण गुमास्ता माणकोजी गव्हाणा जाधव ठेविला तो गुमास्ता बेदरी पादशाही होती ते समई बेदरास नेऊन बंदखानी घातला एक वरीस तो सोडून दिल्हा मागती पुढे दो वरसानी रसद मुले दिवाणानी बेदरास नेऊन बदी दिल्हा त्यास माणकोजी गव्हाणा जाधव याचा जावई माणकोजी खताना याने सासरा बदी पडला ह्मणून आपली सिंगरे घोडीं पाच विकून रसद जमा करून दिवाण रुजू करून पदरी घालून सासरा दिवाणातून सोडऊन आणिला मग सासरियाने सखाडपटी जमीन सेत रुके ८२ जावइयाचे स्वाधीन वतन केले मग पुढें खता ती + + गणोजी झेडा कुणबी चारणकर नान गा + + कर कुणबीयासी सेत ठाण जरथल + + सेत लाविले त्यास सेत रयतावा करून असावे त्यास पुढे जबर-दस्ती करून दिवाणचे रसद होन ७५ बेदरास घेऊन जात होती ते समई ऐवजखान हबसी याची बहीण दुर्गादेवी दियें गावामधे होती तिची पाठ करून दिवाण रसद बेदरास जात होती ते वाट मारून दिवाण रसद लुटून मारा केला ते समई वाटेस मारिले मल्हारजी खताता व मल्हारजी नाईक व माहर १ ऐसे तीन खून जाले तेथून कलह लागला मग पुढे गणोजी झेंडा याने येऊन गावावरी छपा घालून मारा केला ते समई लोक पाडिले बितपसील यशवंतराऊ कठराऊ चव्हाण याचे लेक दोघे व नातू एक ऐसे चौघे जण व पांचवा + + इरासीत काले ऐसे पाच जण जिवे मारिले त्याचा बाइका चौघी सती निघाल्या ऐसे जाले तर त्रास देऊन आपण वतनावरी बैसोन खतातीयानी वतनाचा खेल केला ह्मणून आपण आणी महारास तुज कैसे मारावे ह्मणून जीवदान देऊन मूलानदी

उतरून पिपळीयास आपाजी मोरगुळ व आपाजी व हिरोजी व नाइकोजी याजपासी जाऊन दमला आपण वतन आनमऊन होतो त्यास आपला इनाम चावर दोन त्यामधे बावी ४ च्यार व बाकी महासीची टाकी पाणीयाची पाच आहेत श्रीदेव कावोबायाचे ठावे बाजूस वीराचा बाग याचे सेचारी बेराणा वाळियाचा बाग त्याचे वरता पीक नाइकाचा बाग ऐसे वतन आनमऊन होतो मग पुढे + + कयला यामुळे भास होऊन मानदेसी कुकडवाडास + + सीमधे आळो हे लिहिले * सही

---

लेखांक २७७ १३३० आश्विन शुद्ध ५

बगाड नि० नांगर

।—०—।
 |

श्रीकेदारलिंग

ताळीक

शके १३३० आस्विन शुद्ध पचमी आंबाजी पाटील कसवे सातवें समस्तदेव मिळोन श्री रत्नागिरीस गेले तेथें वसन करून दिल्हे बगाडाचे हक हकदारी करोन दिल्ही देसाई व देशपांडे व समस्त विद्यमानपत्र करोन दिल्हे त्याचा हक बगाडाचा दिवाणाचे रुा ३ तीन आंबाजी पाटलाचा हक रू० ॥ निमे व सकरेची मुंडी व खोबरेची वाटी एक १ व पैसा १ एक प्र कुटा फळी पैसा एक व दुकानास पैसा एक बगाड आवघी माहले उपरी दिवाणानी पाटलास मुंडासे एक व सेला एक एकून ऐसी दोन वस्त्रें दिवाणाचे तश्रीफ बा वेगळेठाचा नाना ०९ तीन पैसे चार्मे व इनाम शेत बीघा ०१ एक मुलकामध्यें बिकड भक्त आस्तीक वीकड गुरव गेलीया पा व चौगुळे यानीं यामध्यें मन न घाळावे ऐसे आहे त्यास कोणी विकत करील तो काशीमध्यें मातागमन व सुरापान करील मुसलमान मोडील त्यास सोराची

---

* ही नकल फार अशुद्ध आहे परंतु पुढें मागें उपयोगी पडेल म्हणून एथें घेतली आहे आनंद संवत्सराला शक ९९६ गत व ९९७ वर्तमान आहे व त्या वर्षी ज्येष्ठ शुद्ध दशमीला वार शुक्रवार शक्य आहे तथापि मूळ ताम्रपत्र शक ९९६।९९७ चें असावें ओवीत मजकूर खराखोटा असल्यास ताम्रपत्र सांपडल्यावांचून अजमावतां यावयाचा नाहीं नकल करणाऱ्यानें भाषा असल अर्वाचीन केली आहे इतकें मात्र खास कीं ९९६ शका हा मराठी ताम्रपट निःसंशय होता

आण व ब्राह्मण मोडतील त्यास गायत्रीची आण ऐसेप्रा। आहे हे लिहिले सही येणे प्रा। हक करोन दिल्हा आहे.

| गोही | ही॥ सखो रंगनाथ |
| --- | --- |
| सुभानजी पाटील पाले | केदारजी पाटील बुजे-रत्नागिरी |
| रामजी पाटील गिरोली | राणोजी पाटील मालेकर |
| सुभानजी देवलकर | खनोजी पाटील आरलेकर |
| खडोजी पाटील ककेलेकर | |
| तुभानजी पाटील जाखलेकर | |

---

लेखांक २७८ — १४६६ फाल्गुन वद्य ११

श्री

नकल अर्वाचीनीकृत

स्वस्ति श्री शके १४६६ क्रोधी सवछरे फालगुण वदि ११ सोमे तदीनी हरबाजी परचुरे याचे पुत्र बेतुल माहाजनी व हरभा व विठल हे त्रिवर्ग परस्परे विभक्त जाले याचे विभाग स्थित ऐसी हे त्रिवर्ग एकवट आसता गोहागरच्या व्यापारानिमित्य दिवाणे धरिले दड घेतला व गावची बाकी घेतली व गाव उटास वाटप लाविला तेणेनिमित्य द्रव्य व सोन रुप व उदकप्रवृती जितुका अर्थ होता तितुका विकून दिवाणास दिल्हा हे इतुके हि देऊन नपर दिवाण न फिटे च रुप आहास बहुसाल जाले व गाव उस आह्मासी घातला या गावाचा व रुणाचा वाटा विठलासी विवाह जाला नाही आणि लेकरू व अप्राप्त ह्मणुन गाव व रुणाचा वाटा घातला नाही रुणासी व गावासी विठलासी समध नाही ह्मणुन ताबे व कासे व गुरे याचा व मासे विठलासी दिल्हे नाही ताबे कासे जे होते ते दुवर्गास मामे वाटून घेतले विठलासी ताब्या गडू एक वाटी एक इतुके विठलासी दिल्हे आता गुराचे वाटे बैल काजू व चिचोरा व पोफळा व मुढा व गाय काली व तिचे वासरू व रेडिया दोन इतुके बेतुल माहाजनीयाचा वाटा दिल्हा चपनवटिका व रोट व गुणा व व हैस १ एक व गाय मोठी व कालीचे वासरू १

एक इतुका वाटा हरीस दिल्हा विठलासी वेल तांबये भडु व कसरा व तावी पावी १ इतुका विठलासी दिल्हा कण जे काही होत ते त्रिवर्गांत कोश घालून घेतले अता वाडियाचे वाटे दक्षणेकडेचा वाटा वाळ जोसी याच्या उतरेकडेचा वाटा तो हरवासी दिल्हा त्या वाटियाचे उतरलता वाटा वेवुल माहाजनी याचि दिल्हा गोविंदभट देवळयाचे वेवारीचा असे वाडियाचे विभाग आला आता मोठी वावी ती रहाटाची ते तिन्ही रहाट तिही वर्गाचे व विठलाचे वाटियातून साळ वावी ते विठलासी च दिल्ही वेवुल माहाजनी याचे वाटियातून रहाट एकाची वावी सुवर्ग खणोन वाधून धावी तेरी घरणे वावी वाटिलिया आता घरे वेवुल मानीयाचे विटिया वळेघर ते वेवुल मानीयास च दिल्हे हरवाचे विटियावले घर ते हरवास च दिल्हे विठलाचे वाटियावरील घर नाही म्हणून विठल वेगळा रिघो लागले तेव्हा घर त्रिवर्ग बांधोन यावे ऐसे रीति घराचे वाटे घरिले जुने घरची वारी सुवरी मांदूस मोठी व अतुक व याचा हा वेवुल ( अपूर्ण )

---

लेखांक २७९

मशहुरल हजरती राजश्री विठल दतो सुभेदार सुभा वा। जासली मशी राजश्री जिवाभाऊ दंडवत सुा सलास चेपगीर गोसावी जटाधारी याचा इनाम हुमगावी आहे आहे आहेत म्हणऊन हुजूर मालूम केले तरी याचे काम बाद कुणबियानी भेवे चालविले आहे तेणे प्रमाणे हाली तुम्ही कुणबियास लेहोन गोसावियाचे चालवणे स्याव

( पुढें गहाळ )

---

लेखांक २८० १६०२ चैत्र शुद्ध ५

श्री

राजमान्य राजश्री जावजी पुण्य प्रभू हवालदार व कारकून पेठ पाट गांव गोसावी यांसी —

स्नेहांकित गणोराम सुभेदार व कारकून सुभा परगणे कुडाळ व माहा जानिहाय अनुक्रमें विनंति सुा समानीन अलफ पेठ मजकुरीं सात पांच

वरसें गलबलियाकारितां वसात करून नव्हते हालीं श्री बावा येऊन राहिले यासाठी पेठ मामूर जाली. त्याचेया प्रसाधें दिवाणीचा मामला खोबरे सुपारी खारिका होते. त्यास श्रीस्वामीस दुकान त्याच्या नावें त्यांस दिलियानें विशेष चालणार. याकारणें पेशजी तबाकूचे गादीचे दुकान होते तेथें हालीं गादी नाहीं. याबदल ती दुकान स्वामीस देवविले आहे तें स्वामीच्या स्वाधीन तुरुतगिरीचे हवाले करवणें ते हरकोणी तेथें ठेंवितील. बावाचे नावें दुकान चालेल. त्या दुकानास महसूल न घेणें वेठी ऊठ त्याचे दुकानीं जो त्याचा असेल त्यासे न घेणें. हा कागद तालीक लेहोन घेऊन असल देणें. छ ३ माहे राबिलावल

(लेखन सीमा)

---

लेखांक २८१ १६०२ आश्विन शुद्ध १

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ७ रौद्र नाम सवत्सरे आश्विन शुा। प्रतीपदा इंदुवासर क्षात्रियकुलावतंस श्री राजा शभु छत्रपति याणीं राजश्री गणोराम देशाधिकारी व देशलेखक प्रात कुडाळ यासी आज्ञा केली असी जे तुह्मी हुजूर येऊन स्वामीस विनति, केली कीं राजश्री मौनी गोसावी पाटगावी रहातात बहुत थोर ईस्वर पुरुष आहे. त्यास पालखी आहे. परतु नेहमी भोई नाहीत तरी नेहमी भोई व वाजंत्री नेहमी करून देविले पाहिजे. यावरून वरशास भोयास व वाजंत्रियास मोईन होन निशाणी १२५ सव्वासे

(श्री
लक्ष्मीनृसिंहभक्तश्री।
निर्णयाब्धि सन्मणे ॥
प्रल्हादवर्धिनी मुद्रा प्र
ल्हादस्य विजृंभते)

करून दिले आहेती यात भोई व वाजत्री ठेऊन देणें ते सेवा करितील तुह्मी सदहू पैके तुरुतगिरी शिष्य गोसावियांचा आहे, त्याजवळ पावीत जाणें. ते भोयास व वाजत्रियास हक पावितील सदहू मोईन इ॥ सालमजकुरापासोन केली असे यासी वाजंत्री तुह्मीं ठेविले आहे. भोई ठेऊन देणें आहे. येसीयासि वाजत्री ज्या दिवसापासून सालमा। ठेविले. असाल ते. दिवसापासून वाजत्रियास

धरणास पंचवीस होनप्रमाणे पाववणें उरले धमर होन यासी भोई ज्या दिवसापासून ठेवाल ते दिवसापासून सालमाचे हक पाववणें पुढें सदहू धमर होन भोयास व पंचवीस सालाब्रियास याप्रमाणे साल दर साल पावीत जाणें; आणि धर्मार्थ म्हणून गोसावीयांचे नावें खर्च लिहीत जाणें याचा सनदेचा उजूर करीत न च जाणें गोसावी कुशल असतील तो ठेवीत जाणें असल गोसावीयांच्या शिष्यापासी देऊन तालीक सुभा विले लावणें सदरहू सवासें होन निवल देविले आहे, तियासी वजाफटाव माफ असे लेखनालंकार

मर्यादेयं विराजते

रुजू सुरूनिवीस
ता छ १९ माहे रमजान
छ २९ शाबान — माहे शाबान
सुरू सूद बार. बार
मोर्तब — पौ छ २९ रमजान

---

लेखांक २८२ — १६२९ माघ शुद्ध ५

श्री

तहनामा चिरंजीव राजश्री शिवाजीराजे यांसी प्रती राजश्री शाहूराजे यानी लिहून दिल्हा सुा समान मया व अलफ राज्याभिषेक शक १४ निरोधिकृत् संवत्सरे माघ शु ५ ता भरण महान सगम दक्षण तीर कुल तुतर्फा मुलुख दरोबस्त, देशील ठाणीं व किले तुम्हास दिले असेत कलम

( १ ) तां वारणा नदी उत्तर तीर व वारणा व कृष्णा या सगमा पासून हद्द् निवृत्तिसगम तुंगभद्रा पावेतों उत्तर तीर दरोबस्त, देशील गड ठाणीं, व मिरज प्रांत, व विजयपूर प्रांतीची ठाणीं, दरोबस्त देशील नवा तुर्मा कदील अंमल व ठाणीं असतील तीं, आमचे स्वाधीन करावीं कलम

[ १ ] वारणा व कृष्णा संगमापासून दक्षण तीर हद्द निवृत्तिसगम तुंग भद्रा पावेतों दरोबस्त, देशील गड ठाणीं, तुम्हांस दिल्ही असेत . . .. . , कलम

[ २ ] कोंकण प्रांत साळसी अलिकडे तह्द पंचमहाल अकोलें पावेतों दरोबस्त तुह्मांकडे दिल्हे असेत.........................कलम

[ ३ ] सेवक लोक लहान मोठे सुद्धां दरोबस्त याणीं आजवर आज्ञेत लागू हुकुमानीं चाकरी केली त्यांसी मागील अपराध मनांत न आणतां येथून पुढें मात्र जिकडील तिकडे चांगले प्रकारें करावें. व इकडील बेइमान चाकर तुह्मी ठेवू नये; तुह्माकडील आह्मी ठेवूं नये...कलम

सदर्हू प्रमाणें आह्मी च.ल. यासी अंतराय होणार नाहीं. मोर्तब असे शिक्याचे.

---

लेखांक २८३ १६२९ आषाढ वद्य ८

कृष्णराऊ ठाणेदार खटाऊ वगैरे



सुरत महजर बतारीख २१ माहे रबिलोवल सु॥ सन १११७ हाजीर मज्यालसी बितपसील

सुभानजी घाटगे हा॥ देसमुखी का॥ लावगुण



माणाजी फडतरे देशमुख पा॥ खटाऊ



या हुजूर राघो सखदेऊ व मलार कुलगो देशपांड्ये पा॥ खटाऊ यासि लिहून दिधला सुरत मजलश ऐसी जे तुह्मामधे व विसाजी कासी व विठल बापोजी अथर्वेदी यामधें पा॥ मजकूरचे देसपांड्येपणाचा कथळा लागोन तुह्मी दिवाणांत उभे राहिलेत आणि तुह्मी आपली हकीकत जाहीर केली कीं

परगणेमजकूरचे देशपांड्येपण व गावकुळकर्ण देह सुमार १८ अठरा व मोतिसी देह १७ सतरा आपली मिरास आपले वडील अनमभीत आले वर मियाने खान अजम अंबरखान याचे कारकीर्दीस विठाजी काशी व विठल बापोजी यांचे वडील आमचे वतनास मुजाहीम जाले ते वखतीं त्यांचा व आमचे वडिलांचा वेव्हार किलेखजाम जाला तेथें अथर्वेदी खोटे जाले आमचे वडील खरे मग तेथील यशपत्र घेऊन आमचे वडील गावास आले त्यावर परगणे मजकूरचे देशकाचा महजर जाला तो महजर व आणीख देसमुखाचे कागद आपणाजवळी हाती आहेत ते साहेबीं मनास आणून बरहक निवाडा केला पाहिजे म्हणून जाहीर केलें त्यावरून अंबरखानाचे वखतींचा महजर व देसमुखाचा कौल व धर्मनामा ऐसे कागद व हकीकत मनास आणून तुम्हांस व त्यांस गोत दिधलें गोतानें तुमचे महजर व कागदपत्र व हकीकत व अथर्वेदियाची हकीकत मनास आणून तुम्हा हरदो वादियांस श्री कृष्णेची क्रिया नेमिली आण हरदूजणाचे राजीनामे घेऊन राजश्री राम्यो मुरार त्रिंबाण व परगणेमजकूरचे देसक व परगणे हयभल देसमुख व देशपांड्ये व मोकदम गावगणा याबरोबर तुम्हां दोघा वादियांस देऊन श्री कृष्णातीरास नजीक श्री सिवनाथदेऊ का। रहिमतपूर क्रियेस नेमून पाठविलें यजास जाऊन परगणेमजकूरचे पटेल व गोत यांनी दसरात्र व पचरात्री लिहून घेऊन दोघे वादी श्री कृष्णेंत उभे केले आणि पटेलांस व गोतांस दिवाणें हुकूम केला कीं तुमचा वतनदार देशपांड्या जो कोण खरा असेल त्यास हातीं धरून बाहेर काढाबणें म्हणून हुकूम केला त्यावरून पटेल व बाने गोत परगणेमजकूर यानीं जाऊन विठाजी काशी व विठल बापोजी यांस हातीं धरिलें आणि माघारे मुरडले ते वेळेस अडखळोन कृष्णेंत च पडले वितपशील

कृष्णाजी उबल पाटील मोकदम यचपा मेहतर सदी का। खडाऊ १
मौजे दरून १

एणेप्रमाणे दोघेजण अडखलोन पडिले तेव्हा व तुम्ही कुळ मजालसीस आहिराना केला परंतु कोणे खातरेस आणिलें नाहीं त्यावर दसरात्र–पचरात्री मधें त्यास क्रिया लागली बितपशील

अथवणास क्रिया लागली

| | गावगना |
|---|---|
| १ नारो केशव विठाजी काशीचा चुलत भाऊ चौथे दिवशीं मयत जाला | १ मोजे कुरोली एथील मेहतर माहार याचें घर जळालें |

१ विसाजी कासीचा लेक रामाजी याची बाईल मेली
१ तुको सिवदेऊ जोसी कातर खटाऊ याची बहीण जे दिवर्शी क्रिया केली ते च दिवशी साइ-काळीं मेली
१ हरी बापोजीचा लेक सकराजी याची बाईल मेली
१ विठल बापोजी याचे वांटेकरी लोणीस होता त्याचे बैल चोरा-नीं जे दिवसी क्रिया जाली ते च दिवसी चोरांनीं रात्रीस नेले ७

५

सिलेमानखानाची स्वारी आली होती त्यांनी खराबी केली गावगणा बिता।
१ उबरमळे ऐथील गुरें व वासरें कुल नेलीं गांवचा सत्यानास केला—कलम
१ मौजे लावगुणचा लिंगोजी पाटील याची मका राळा व सेत कापून कापून नेलें खराबी जाली—कलम
१ मौजे पुसेगाऊ एथील वासरे ५० जिवे मारिलीं व गांव लुटिला—कलम

३

२ कसबे खटाउकरांस क्रिया लागली
१ सगा कुंभार
१ घर जळाले
१ ह्मैसी सिलेमानखा-नाने नेल्या २

२ एकूण कलमें दोन

१ जोगा कुंभार याची ह्मैस सुले-मानखानाने नेली ते सोड-वावयास रु॥ ७ नेल्हे होते ते चोपदारांनीं ह्मैस रदका नेला—कलम
१ पोतदाराचें घर जळालें

३

१ देउजी पाटील मौजे वडूज याची घोडी बुधवारीं मेली—कलम
१ तुलाजी फडतरे याचे हुसेनपुरी हून चोरांनीं नेले बैल ८—कलम
१ नरसोजी पाटील कातर खटाऊ याचा मळ्यातून राळा व नागली व मका चोरांनीं कापून गेला
१ दरुजकर जगथाप याची ह्मैस नेली—कलम
१ मौजे भोसरें एथील माउजी पाटील याचा पुतण्या मालजी पाटील याचे घर जळालें—कलम
१ मौजे लोणी येथील पाटलाचा बदियाची व माळियाची घरे जळालीं—कलम

१०

एणेप्रमाणे क्रिया लागली ते मनास आणून रुगवेदी यास व अथर्वणास रांगणियास रवाना केलें असे हा सुरस महजर लिहून दिल्हा सही मोर्तब सुद

((फारसी))

---

लेखांक २८४ १६४४ भाद्रपद शुद्ध १३

श्री

नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४९ शुभकृत नाम संवछरे भाद्रपद शुद्ध त्रयोदसी सोमवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति स्वामीयाणी

{ शिका शिका } मुद्राधारी व कारकून किले सुधागड यासि आज्ञा केली ऐसी जे राजश्री माहादाजी कृष्ण

व गोविंद कृष्ण उपनाम जोशिशी गोत्र शांडिल्य सूत्र आश्वलायन हे स्वामीचे पुरातन सेवक तीर्थरूप राजश्री थोरले कैलासवासी स्वामीपासून बहुत नेष्ठेने सेवा केली व तीर्थस्वरूप राजश्री संभाजी राजे काका यांची सेवा केली व त्याउपर तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी चंजीस असता वाम्नाचे संकट प्राप्त आले ते समई माहादाजी कृष्ण हे संताजी घोरपडे व जाधवराया समवेत फौजा घेऊन गेले तेसमई विशेषात्कारे सेवा केली याकरिता यावरी राजश्री कैलासवासी स्वामी कृपाळु होऊन चंजीचे मुकामी यास मौजे खवली ता पाली हा गाव कुलबाब कुलकानु खेरीज हकदार व इनामदार करून जलतरुपाषाणनिधिनिक्षेपसहित हाली पटी व पेस्तरपटी देखील इनाम अजरामऱ्हामत देऊन सनदा दिल्या त्यावरी मारनिलेनी व त्याचे पुत्र राजश्री बाळाजी माहादेव याणी राजश्री शिवाजी राजे दाजी याची सेवा केली त्याजवरून त्याणी हि मौजे मजकूर यास इनाम चालवावयासी आज्ञा करून पत्रे दिल्ही त्याप्रमाणे गाव यास इनाम चालत च आहे ऐशास माहादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण बाळाजी माहादेव व रामचंद्र माहादेव व कृष्णाजी माहादेव हे स्वामीचे एकनिष्ठ सेवक यामधे बाळाजी माहादेवयाणी वडील वडिलापासून स्वामीचे सेवा एकरूप निष्ठेने केली व हाली करीत आहेत याचे चालवणे स्वामीस आगत्य याकरिता तीर्थरूप राजश्री कैलासवासी

स्वामींनी मौजे खवली ता॥ मजकूर हा गाव चजीचे मुकामी माहादाजी कृष्ण यास इनाम वशपरंपरेने इनाम दिल्हाप्रमाणे स्वामींनी हि चालवायाची आज्ञा करून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी तुह्मी मौजे मजकूर यास पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवीत जाणे या पत्राची प्रती लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास परतोन देणे निदेश समक्ष (सिका)

रुजु

सुरु सूद बार

सिका सिका

---

लेखांक २८५. १६४४ भाद्रपद शुद्ध १३

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ४९ शुभकृत नाम संवत्सरे भाद्रपद शुध त्रयोदशी मदवार क्षत्रियकुलावतस श्रीराजा शभु छत्रपति स्वामी याणी समस्तराजकार्यधुरधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री कान्होजी आंगरे सरखेल यासि आज्ञा केली ऐसी जे राजश्री नारो कृष्ण उपनाम जोशी शांडिल्य गोत्र हे स्वामीच्या राज्यातील पुरातन सेवक या राज्यांत निस्टेने सेवा केली त्याउपर सेवा सोडून आपला काल सार्थक व्हावा याकरितां स्नानसंध्या करून ईश्वरभजनी लागले याची योगक्षेमाची अनकूलता करून दिधल्याने स्वामीस व स्वामीच्या राज्यास श्रेयस्कर याकरितां विशालगडचे मुकामी कैलासवासी थोरले स्वामी कसबा मुरूड ता॥ पंचनदी प्रा॥ दाभोल पैकी त्कारी दाभोली लारी ४०० च्यारसे पुत्रपौत्रीं वृती पूर्वी राजश्री सिवाजी राजे दाजी याणी दिल्ही प्रस्तुत नारो कृष्ण याणी वैकुठवास केला त्याचे पोटी संतत नाही याकरिता त्याचे भाव राजश्री माहादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण व पुतणे राजश्री बालाजी माहादेव व रामचद्र माहादेव व कृष्णाजी माहादेव याणी विनति केली व पत्रें आणून दाखविलीं सदरहू च्यारसे लारीची वृती आपणास उतरोवर चाले ऐसी आज्ञा करावी त्यावरून सदरहू वृती यासि पुत्रपौत्रादिवसपरपरेने करार करून हे आज्ञापत्र तुह्मास सादर केलें आहे तरी तुह्मी हे वृत यास

नेमून देउनु वंशपरंपरेने चालवणे साल दर साल ताजा सनदेचा उजूर न करणे या सनदेची प्रती लेहून घेउनु मुख्यपत्र माहादाजी कृष्ण गोविंद कृष्ण व बाळाजी माहादेव व रामचंद्र माहादेव व कृष्णाजी माहादेव व श्रीधर गोविंद यांजवळ भोगवटियास परतोन देणे बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा

मर्यादेयं
विराजते

बार

---

लेखांक २८६ १६५१ फाल्गुन शुद्ध ४

श्री

राजश्री देसाई व देशपांडे वर्तमान व भावी सुभा प्रांत दाभोळ गोसावियांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य

श्रो सेखोजी आंगरे सरखेल रामराम सुहुर सन सलासीन मया व अलफ राजश्री नारो कृष्ण उपनाम जोशी शांडिल्य गोत्र हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन सेवक सेवा एकनिष्ठेनें केली त्याउपरी सेवा सोडून आपला काल सार्थक व्हावा याकरिता स्नानसंध्या करून ईश्वरभजनी लागले यांची योगक्षेमाची अनकूलता करून दिधल्याने स्वामीच्या राज्यास श्रेयस्कर याकरितां विशाळगडचे मुकामी केलाबयासी छत्रपति स्वामी याणी कसबा मुरुड ता पंचनदी प्रा मजकूरपैकी खारी दामोळी खारी ४०० च्यारसें खारी पुत्रपौत्री वृती करून दिल्ही प्रस्तुत नारो कृष्ण याणी वैकुंठवास केला त्यांचे पोटी संतत नाही याकरितां त्यांचे भाउ राजश्री माहादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण व पुतणे राजश्री बाळाजी माहादेव व कृष्णाजी माहादेव व नातू नारो राम चंद्र याणी हुजूर जाऊन विनति केली श्रीमंत राजश्री छत्रपती स्वामींची राजपत्रें आणिली व हाली राजश्री बाळाजी माहादेव कुलाब्याचे मुकामी येऊन रदबदल केली त्यावरून कसबे मारी वृतीपत्र खारी च्यारसे करून सावा त्यास कसबे मजकुरीं बहुतेक वतनदारांची सेतें सदरहू खारींची भेरीज न भरे याकरितां भेरिजेची भरती करून दिल्ही असे

गोविंद गोपाळ वश लग ०

उद्धव विश्वनाथ १

सदर्हू पांच जण माऊ बद्य विशाची परशराम पानशी सुहुरसन तिसा सब्बासीन मया अलफ कारणें लेहोन दिल्हें पत्र ऐसें जे पूर्वी मौजे सानवडी ता कन्हेपठार प्रा पुणें एथील आपलें कुळकर्ण व जोतीष व पुरातन त्यावरी रामाजी बिन कृष्णाजी हरीन-गांवजी गांवसखेराऊ मुतालीक आपले वडिलीं ठेविला होता तो वृत्ति आपली ह्मणऊन वादास प्रवर्तला त्यास याशी वाद घालावयाचे प्रसगीं तुमचे वडील रखमाजी बापुजी व बाबाजी बापुजी व शिवाजी बापुजी व गोमाजी बापुजी चतुर्वर्ग बधूस आमचे वडील त्र्यंबक विश्वनाथ व मोरो विश्वनाथ व माणको विश्वनाथ व गोविंद विश्वनाथ व उद्धव विश्वनाथ पांच जण बंधू यांणीं पुसिलें कीं वतनावर रामाजी बाधा उठिला त्यास याशी वाद घालावयासी सामील होणें आणि समापत्रांत नांव घालणें ह्मणऊन विचारिलें ते समई तुमच्या वडिलीं उत्तर केलें कीं आह्मास वाद सांगावयासी अनकूळ पडत नाहीं आमचें नांव समापत्रांत न घालणें वृत्ती राखली तर तुह्मी च राखणें मग याश्व वरभावानीं विचार करून वरभावानीं च समापत्र केलें आणि रामाजी गांवसंखेरायाशी वाद घालावयासी उभे राहिले कितेक दिवस ठाणियांत वाद जाला त्यावरी राजगडीचे मुकामीं माहाराज राजश्री राजेसाहेबाचे दरबारीं वाद पडिला त्यास रामाजी गावसखेराव खळबाया माहामात बहुत ऐसें असोन आमचे वडिली वाद बहुत घातला कसाले सोसिले सेवट माहाराजसाहेब यांणीं मौजे मोहरीस श्रीअमृतेश्वरी दिव्य करावयासी गोविंद विश्वनाथा वा अष्टप्रधानाचे कारकून व हुजरे देऊन पाठविले गोविंद विश्वनाथ यांणीं दिव्य केलें खरा जाला बाधा खोटा जाला मौजे मनकूरचा जानोजा बिन बाउजी काळा हमबाही गोतासेरीज समाकुल पांढरीसेरीज होऊन रामाजी गावसखेरायाशी मेऊन एकलियानें त्याचे साखी गोही दिल्ही होती त्यास माहाराज राजेसाहेब यांणीं गोतमुखें व पांढरीचें मुखें मनास आणितां पानशी खरे व दिव्य केलें त्या मध्य खरे निघाले मग वृत्तीचा महजर गोविंद विश्वनाथ यांच्या नावें करून दिल्हा आणि जानोजीमनकूर याची जीभ कापावयास माहाराज राजेसाहेब यांणीं हुकूम केला मग गोविंद विश्वनाथ यांणीं रदबदल करून मिरासभाऊ ह्मण

ऊन जीव कापीत होते ते सोडविली यास खर्च उदंड जाला व अवरंगाबादेचा हि खर्च जाला व महजरात हि खर्च जाला व देशमुख व देशपांडे व गोतखर्च हि बहुत जाला ऐसा खर्च करून महजर घेऊन व समस्त भाऊ ऐसे गांवास आले ते समई तुमचा चुलता रखमाजी बापुजी व तुमचे तीर्थरूप बाबाजी बापुजी बोलाऊन पुसिलें कीं पेशजी तुह्मी गाढेपाइकी करून वादास सोबत न दिल्ही आह्मी वडिलाचे पुण्यप्रतापें दिव्यीं खरे जालो खर्चवेच मोबलग करून महजर करून आणिले तर आपले निमे तक्षिमेचा खर्च पडिला आहे तो सावकाराचा देणे आणि आपली तक्षीम निमे खाणे ते समई तुमच्या चुलतियानीं व बापानीं उत्तर दिल्हे आपणास टक नाही कष्टमेहनत केली व खर्च हि केला दिव्य केले ईश्वरे तुह्मांस वृत्ति साध्य केली यश दिल्हे तरी तुह्मी आपली तक्षीम जोतीश कुलकर्ण निमे खाणे ह्मणऊन खुपरजावदीने हस्ताक्षरें पत्र लेहोन दिल्हे पत्र बिता।

श्रीशके १५९० कीलक नाम संवत्सरे फाल्गुण वद्य तृतीया बुधवार ते दिवसीं त्रिंबक विश्वनाथ यासि रखमाजी बापुजी व बाबाजी बापुजी व शिवाजी बापुजी व गोमाजी बापुजी लेहोन दिल्हे ऐसे जे मौजे सानवरीच्या कुळकर्णाचे भाडण रामाजी गावखडेराव यांसि लागलें होतें दिव्य केलें खरे जालां तो वाद सागतां पैके पडिले त्याणीं तक्षीम आपणास द्यावयासी नाहीं पैकियाचें व्याज वाढेल आणि दोही गांवास लिगाड लागेल ह्मणऊन सोनवरीचें कुलकर्ण व जोतीश पैकियाकारितां तुह्मास आपले खुषीनें लेहोन दिल्हे यासि अर्थाअर्थी समंध नाहीं एणेप्रमाणे असलपत्र

गोही

| | |
|---|---|
| बहादुरखान वलद हबूबखान | मोकदम मौजे दिग्रे |
| सिक्का | निशाणी नागर |
| सूद | मल वरटा |
| माव मेहतर | जाव सुतार |
| बहिर परणा | एस माळी |
| लखम साळवी | मोतादिक माहार |

एणेप्रमाणें निकालसपत्र लेहोन दिल्हे त्यास साठी पांसेष्ट वरषे होत आलीं तुमच्या वडिलाच्या लिहिल्याप्रमाणे आह्मी निमे वृत्ति पाचजण भाऊ

अनभवीत आलों तुह्मी मागती आह्मासी उपद्राप केला कीं माझे वडिलीं लेहोन दिल्हें परतु नावधान हावे तुह्मी कुटुंबपोषक होवा हाली आपला खर्च पडिला असेल तो व्याजसुद्धा घेऊन माझी वृत्ति मोकळी करणें ह्मणऊन प्रसग तुह्मी जगजीवन शामराज व बनाजी मोरेश्वर व रामचद्र गोविंद व संडो सिवदेव व गोविंद गोपाळ यांसि केला एक दोनी संवाद मौजे दिवें का सासवड येथील पारीं जाले त्यावरी एकदोनीवा प्रसग मौजे वाघोली ता हवेली प्रा पुणें येथील पारीं राजश्री पिलाजी जाधव मोकदम मौजे मरकूर यांजपासी जाला परतु हा कजिया परिछिन्न वार्दे कोण्ही निवडिला नाहीं त्यावरी तुह्मी मौजे दिवें का सासवड येथील पारीं बळात्कारें बनाजी मोरेश्वर यापासून कोण्ही भाऊ हजीर नसतां कळेल तें रीतीनें लेहोन घेतलें त्याणीं प्रसंग पाहून लेहून दिल्हें लिहिलें आतमसतोषाचें नव्हें वरकड भाऊबद यान्द ठेवितील ऐसें जाणोन बनाजी मोरेश्वर याणें बिकलम जुलूम ऐसे सेवटीं लेहोन कागदपाठावरी यादव माळी पुणेकर व समस्त लोक याजपुढे ठेऊन घरास आला तोंच गांव सोडून खडो सिवदेव यांजकडे मौजे करदी प्रा नेवासें येथें वर्तमान सांगावयास आला तेथें वर्तमान सांगितलें राजश्री सभाजी जाधव दिमात यसीन आपणास नेऊन रजावद नसतां लेहून घेतलें मग आपण बिकलम जुलूम ह्मणून दस्तखत खाऊन गैरहजीर होऊन तुमचे भेटीस आलो त्यास पत्र दिकतीचें ह्मणून तुह्मी सभाजी माणकेश्वर यावरी कर्जाचा पेंच ठेऊन त्याचे हातींचे दुसरें पत्र करून घेतलें आणि कुलकर्ण करार सें रामचद्र गोविंद व गोविंद गोपाळ हे हकमाकडे किले पुरधरास राजश्री बापुजी श्रीपत याजवळ जाऊन उभे राहिले आणि हकीकत सांगितली कीं आपल्या वडिलास निंबाजीपताच्या वडिलीं खुसीनें सोनोरीचे कुलकर्ण जोतीश वक्षीस लेहोन दिल्हें त्यास साठी पासेष्ठ वरसें जालीं असता पत्रप्रमाणें आम्ही खाव असतां हालीं निबाजी याणीं कज्या करून आपला भाऊ बनाजी मोरेश्वर व सभाजी माणकेश्वर या पासोन जैसें मनास मानेल तैसें लेहून घेतलें दियामध्यें राजश्री सभाजी जाधव याची मालुमात करून पत्र लेहून घेतले आपणावरी जुलूम जाला तर आपला इनसाफ करावा मग राजश्री बापुजीपत बोलिले कीं इनसाफ पेस्तर करून तोंवर असणें मग राजश्री बापुजीपतांनी सोनोरीकर पाटिलास चिठी पाठविली कीं सोनोरीचें भांडण निंबाजीचे व राम चद्र गोविंद याचे पडिलें त्यास इनसाफ पेस्तर होइल तोंवर कुलकर्ण—जोतिसाचें काम तुम्ही चालवणें ऐसी खटपट रामचद्र गोविंद व गोविंद गोपाळ

याणीं करून तुमचा इतला कुलकर्ण व जोतिषात होऊ दिल्हा नाहीं त्यावरी वनाजी मोरेश्वर व जगजीवन सामराज व भगवत सामराज व रामचद्र गोविद हे ती चौ वरषात एकामाघे एक मृत्य पावले खडो शिवदेव व लक्ष्मण माणकेश्वर हे कसालियामुळे पोट भरावयासी गगथडीकडे नेवासेप्रातें गेले सोनोरीस गोविद गोपाळ व जगजीवनपतांचीं मुलें धाकटीं राहिलीं त्यावरी कज्या मोघम राहिला याजवरी खडो सिवदेव व लक्ष्मण माणकेश्वर देशास आले देशीं येऊन मूळ वृत्ती भुतोपताची पाच गाऊ नीरथडीचे दोनी पिढिया वापभाऊ खात होते तेथे आले तेथे जिवाजी सावाजी व माहादाजी चिंतामण व खडो नागनाथ व कान्हो केशव याशि वाद पडिला मग सातारां एऊन राजश्री नागो शकर पंतसचिव जिल्हेदार यासी भेटून महादाजी चिंतामण हुजूर आणविला पचाइतीस स्थळ मौजे चादक समत हवेली प्रा वाई हे थळ मागोन घेतलें वाद फार सागितला ते प्रसंगी माहादाजी चिंतामण वदला कीं पूर्वी परभुणियाचा वाद आपले वडिलीं सागितला शिरवळीं दिव्य आपले वडिलीं केले त्यावद्दल खर्च जाला तो व्याजसुद्धा देणे व आजीपर्यंत वतनामुळें पडझड पडली तो हिशेब वारणें त्याप्रमाणे गोताने आज्ञा केली कीं हें वारावे आणि आपली तक्षीम खावी त्यास पूर्वी आमचे वडिलीं विसाजी परशराम याणीं अठरा होन दिल्हे होते ते त्याचे आंगीं लाविले व त्रिंबक विश्वनाथ याणीं सौम्य सवत्सरीं सोनवरीचें दिव्य जालियावरी दुसरे वर्षी मौजे भोळीस येऊन परभुणियाच्या दिव्यावदल खर्चाचा हिसेब करून होन सत्तावन ठराविले त्यास त्रिंबकपतीं रंगावा पानसी त्याच्या घरातील भाऊ याचरावरी घोडा विकावयासी रत्नागिरीस यात्रेस पाठविलें त्याचा होन सवासे त्याकडे होते व इनामाचे खत सोडविले होतें त्यास त्रिंबकपंतीं या पैकियाचे व्याज व मुदल हिसेब केला त्याणीं सत्तावन होनाचा व्याज मुदल हिसेब केला ऐसा कज्या वाढला मग पांचा गावातील निमेचा भाऊ काकाजी राम व भोळीचे पाटील व बारा बलुते श्रीसिद्धेश्वराचे देउळीं निरेचें काठीं वसून कज्या निवडिला मग त्रिंबक विश्वनाथ यासी अवघियाणीं पदर पसरून घोडियाचा पैका सवासें होन होते ते खर्चावदल सत्तावन होनाचे ऐवजी देविले व इनामबा खत मोघम त्रिंबकपंताचे ठेविले आणि पांढरीचे साक्षीने पत्र करून घेतले पांचा गावामध्ये एक वाट। वडील घर सावाजीपत व मल्हार राम याचा व एक

वांटा त्रिंबक विश्वनाथ याचा व एक वांटा तिसरा कृमाजी बापुजी यांचा एकूण तिमेमध्यें तिघे भाऊ वंशभाऊ अनुक्रमपरनाळेकेनें खावे म्हणून पत्र दिल्हें तें पत्र वजिनस आह्मी गोतादिसता माहादाजी चिंतामण व खंडो नागनाथ यास दाखविलें त्याची साक्ष गोतमुखें पुरली मग गोतन्यायें दिव्याचा खर्च उठाला मग महादाजी चिंतामण बोलिला कीं या पत्रास बहुत दिवस झाले त्यावरी तुमचा भोगवटा नाहीं राजकामुळें आह्मांस नागवणा व पडी पडिलिया मिरासपटिया व इनामविजाई पडिली तो हिसेब करून मारणें आणि आपली वाषी वक्षीम खाणें मग गोतांनीं हिसेब मनास आणून आह्मांकडून त्याचे पडीचा पैका देविला तो मारफास गणेश गगाधर कुलकर्णी मौजे चांदक आह्मी माहादाजी चिंतामण याचे पदरीं घासला कांहीं राहिला होता तो सर्वे व खंडो नागनाथ याची आई पार्वतीबाई काशीस गेली तो त्यांजवळ दिल्हा आणि आपली वक्षीम खरी करून घेतली त्याचें पत्र शिवाजी बाबाजी व माहादाजी चिंतामण व खंडो नागनाथ यांचें करोन घेतलें व निसेकडील पत्रें करून घेतलीं त्याची खर्च सातारां वसला व मावास हि गांवीं आऊन बहुमान केला आणि पत्रें भीरवळनाथाचें देउळीं त्याजवळून घेतलीं देह सिा

| पा शिरवळ | ता नीरथडी पुण |
| --- | --- |
| १ मौजे मोळी | १ मौजे वोडील |
| १ मौजे वोडील | १ मौजे छोणी |
| १ मौजे गुमप | २ |
| ३ | |

एकूण पाच गावीं सहावी वक्षीम करार वंशमालिकेनें खरी करून घेतली त्यावरी खंडो शिवदेव व लक्ष्मण माणकेश्वर श्रीमंत राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान यांसि मौजे सेंडेरासोरी प्रांत शिरवळ या मुक्कामीं भेटून सांगितलें कीं आपला व निंबाजी बाबाजीचा सोनोरीच्या वतनाचा कज्या निवडला नाहीं तर निंबाजीपंतास हुजुर आणून त्यास व आह्मास गोत देऊन वरदक मनसुबी करविली पाहिजे त्यावरून हुजास राजश्री पंतप्रधान याणीं पत्र पाठऊन लष्करास बोलाऊन आणिलें हुजास व आह्मास गोत राजश्री मल्हार मुकुंदेऊ पुरंधरे व राजश्री माहादाजी आंबाजी पुरंधरे देशपांडिये कर्यात सासवड हे नेमून दिल्हे हरदो जण या गोतास रजावंद जालों सावरडीहून

सोनोरीसंनिध आमचे वंशपरपरेस सासवडकर वाकीफ आणि दियांचे देशपाडे आमचे मायथळ आहेत दिवाणांनीं हे गोत नेमून दिल्हे त्यास आह्मी उभयता मान्य असो ऐसें बोलोन तुह्मी व आह्मी सासवडकर पुरधरे देशपांडिये याजवळ आलो तुमचा आमचा करीना त्या उभयतांनीं मनास आणून ते उभयता वधू बोलिले कीं तुह्मी गोतमुखें निवाडियास राजी आहां कीं भाऊपणियाने घरीं समजतां हे गोष्टीचा विचार करून सांगणें गोतात निवाडियास रजावद असाल तरी तैसे च सागणे घरीं समजणे असेल तरी आपला विचार दृढ करून समजणें मग तुह्मी आह्मी ऐसे घरास आलो परस्परें भाऊपणियाने आपल्या आपणांत सवाद केला त्यास तुमच्या व तुमच्या पुत्राचें मतें व आह्मांस खडो शिवदेव व लक्ष्मण माणकेश्वर व गोविंद गोपाल यांचे विचारें समजाविशीचा प्रसग निघाला तुह्मी बोलिलेत कीं मौजे सोनवरीचें कुलकर्ण व जोतीश आपले वडिलीं आपली निमे तक्षीम तुमच्या वडिलास खर्चाबावत लेहून दिल्ही आहे ते खरी त्यामधून तुह्मी आह्मास निमे जोतीश आमचे तक्षिमेचें मोकळें करून देणें व कुळकर्ण निमे आमचे तक्षिमेबाबत आहे तें तुह्मी सोनोरीच्या खर्चाबदल तुह्मी घेणें ऐसे बोलिलेस त्यावरी आह्मी त्रिवर्गांनीं तुह्मासीं उत्तर केलें कीं आमच्या वडिलास तुमच्या वडिली आत्मखुशीनें आपली तक्षीम खर्चाबावत लेहून दिल्ही आहे तें लिहिलें कैसें मोडतें मग तुह्मी उभयतांनीं निकाल काढिला कीं तुमचे वडिलीं पूर्वी निरथडीचे पांच गाव सदहू सुरळीत केले त्यावरी भोगवटा पडला नाहीं त्यावरी कितेकां दिवसा त्या वृत्तीचा खंडोपर्ती खर्चवेंच करून जीर्णोद्धार केला त्यामध्ये आपली तक्षीम खर्च दिल्हियानें पोहचते पूर्वी व हालीं खर्चवेंच आपणाकडून पावला नाहीं यास्तव तेथील साहावी तक्षीम तुमची आमची ठरली त्यापैकीं निमे तक्षीम तुमची व निमे आमची धाकुटपणाची आपली त्यापैकी निमे पांचा गांवीचें कुलकर्ण व जोतीश चौथी तक्षीम तुह्मा पाचा भावास दिल्ही असे आणि मौजे सोनोरीचें जोसपण तुह्मापाशीं निमे आपले तक्षिमेचे मागोन घेतलें याप्रमाणें तुह्मी मान्य केलियां तुमच्या वडिलाचें केलें व आमच्या वडिलाचे लिहिलें प्रमाण राहिले व भोळीं वगैरे पाचा गावींचा खर्चवेंच तुह्मी व तुमचे वडिलीं केला विभाग तक्षीमप्रमाणे आह्मी द्यावा तो हि तुह्मांपासून आह्मी भाऊपणियाच्या नात्यानें मागून घेतो ह्मणून तुह्मी आह्मास निर्मळ चित्त करून बोलिलां त्यावरी आह्मी

त्रिवर्ग भाऊ प्रसंगीं होतों एकत्र बसोन विचार केला कीं निंबाजीपंत व यासी निंबाजी हे भाऊपण्यानें ऐसा निकाल काडितात तो भाऊपणियावरी दृष्टी देऊन मान्य करावा मग सखो शिवदेव व लक्ष्मण माणकेश्वर व गोविंद गोपाळ या त्रिवर्गानें तुह्मास समत दिल्हें जे तुह्मी भाऊ आहां जें तुमच्या विचारास आलें तें आह्मी मान्य केलें आह्मी त्रिवर्ग बोलिलों कीं मौजे सोनोरीचें कुळकर्ण व जोतीश तुमची तक्षीम निमे तुमच्या वडिलांनीं आमच्या वडिलास खर्चाबावत लेहून दिल्ही त्यापैकीं ओशपण तुह्मी आपलें मागितलें तें तुह्मांस तुमचें निमे तक्षिमेचें दिल्हें व कुळकर्ण तुमचें तक्षिमेचें निमे आपणास वडिलाच्या लिहिल्यापैकी राहिलें तें आपण घेतलें भोळी वगैरे पांचा गांवींची साहाबी तक्षीम आमच्या घराणियाची त्यापैकी निमे तुमची पोहचते त्यापैकी तुह्मी आह्मास निमे तक्षीम कुळकर्ण व जोतीश दिल्हें तें आह्मी घेतलें व निमे तुमची तक्षीम जोतीश कुळकर्ण आह्मी तुह्मास दिल्हें साहाव्या वाटियांत चौथी तक्षीम करार जाहाली व साहाव्या वाटियांत तुह्मांबावत चौथी तक्षीम आह्मां पांचास खर्चाबावत राहिली व सोनोरीचें कुळकर्ण निमे तुह्मांबावत आह्मां पांचा भावांस करार राहिलें व भोळीचा खर्च तुह्मांस भाऊपणियाकरितां बोलिला असे व सोनोरीचें जोतीश तुमचें मोकळें केलें असें ऐसा छोरस तुमचा आमचा जाहाला मग तुह्मी आह्मी ऐसे घरांत समजोन रामभी मल्हार तुकदेव व रामभी माहादाजी आंबाजी पुरंधरे देशपांडिये कर्यात सासवड यांजपासी येऊन वृत्तांत सांगितला कीं घरामध्यें आह्मी भाऊपणियानें समजलों सदरहू करार तपसीलवार उभयतां निवेदित केला वेगळाले वेगळाले त्यांणीं नेऊन पुसिलें त्यास करारास तफावत वचनांस न पडला मग त्यांणीं उत्तर दिल्हें कीं भाऊपणियानें घरांत तुह्मी समजलेत बहुत उत्तम केलें या करारप्रमाणें तुह्मी आपलें पत्र निंबाजी बावाजीस लेहून देणें आणि निंबाजीचें तुह्मी पत्र लेहोन घेणें ऐसे त्यांणीं सांगितलें त्यावरी तुह्मी आह्मी घरास आलो विचार मानस आणितां पत्रें परस्परें असावीं वृत्तीच्या कारभार पुढें पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें चालिले पाहिजे आणि सोनोरीचा व पांचा गांवींचा तुमचा आमचा गरगशा वारे तो ऐसे परस्परे सुरळीतपणें पत्रें घ्यावीं ऐसा निश्चय जाला मग हें पत्र तुह्मास आह्मी आपले खुषरजावंदीनें लेहून दिल्हें आणि तुमचे पत्र आह्मी खुषरजावंदीनें लेहून घेतलें सदरहू निवाडियाप्रमाणे तुह्मी व आह्मी वतावें भोळी वगैरे पांच गांवीं साहे तक्षिमेंत चौथी तक्षीम ठरावली भोळीचा खर्चयेच तुह्मी आह्मांपा

सून सोडऊन घेतला सोनोरीच्या खर्चाबदल कुलकर्ण निमे तुमचे तक्षिमेचे तुह्मी आह्मांस दिल्हे सोनोरीचे निमे भटपण तुमचे आह्मी मोकळें केलें असें याउपर तुमचा व आमचा सोनोरीचा व पाचा गावींचा तक्षिमेबाबत व खर्चावेंचावाबत कजिया राहिला नाहीं यासी कोण्ही अन्यथा वर्तणूक करील तरी त्यास श्री कुलस्वामीची शफत उभयपक्षीं असे याउपर वतनाची पडझड पडेल ते तक्षीमप्रमाणें तुम्ही देणे व तक्षीमप्रमाणे आह्मी देत जाऊ उत्पन्न होईल ते तक्षीमप्रमाणे तुमचे तुह्मी घेत जाणे आमचें आम्ही घेत जाऊं आमचे कागद हरकोणा भावाबदाचे हातीचे व वडिलाचे वेळेचे देखील बनाजी मोरेश्वर व सभाजी माणकेश्वर जे काहीं तुह्माजवळ अगर कोठें दुसरे ठाई असतील ते तुह्मी माघारे द्यावे ऐसा करार केला कालकला कोठे चुकोन अगर तगाफलीने राहिले तरी ते रद्द असेत तुमचे कागदपत्र जे आपणाजवळ या कजियाबाबत असतील ते हि रद्द असेत हालीं तुमचें पत्र घेतले व आह्मी पत्र दिल्हे त्यामध्ये तुमच्या वडिलाचें पत्र सोनोरीबाबत उगवलें ह्मणून ते पत्र माघारे द्यावे ऐसा करार जाहाला सालीनहाल कोठें राहिले तरी ते रद्द असे हालीं तुमचें पत्र तुमच्या पुत्राचे दस्तूरचे लेहून घेतले व हें पत्र तुह्मास लेहून दिल्हे आमच्या बुडातील भाऊ वश रामाजी परशराम व वश कृष्णाजी परशराम याचा तुह्मासी काहीं कथळा नाहीं ते व आह्मी आपले निमेमध्ये वाटणीप्रमाणे समजोन खाऊ व तुम्हाबाबत सोनोरीचे निमे कुलकर्ण व भोळी व पाचा गावींचे तुमचे निमेपैकीं निमे खर्चाबाबत आह्माकडे ठरावलें तें विसाजी परशराम याचा वश असेल तो खाईल तेरीख छ ११ माहे साबान बिकलम खडो शिवदेव पानसी कुलकर्णी व जोतशी देहाय मजकूर अजे माणको विश्वनाथ सही

नकल बिदस्तूर लक्ष्मण माणकेश्वर पानसी कुलकर्णी जोतिशी देहाय मजकूर वश विसाजी परशराम

गोही

त्रिंबकराव माणकेश्वर आा देशमुख पाा शिरवळ

पत्रप्रमाणे साक्ष मलार तुकदेव व माहादाजी आबाजी पुरधरे जोतिसी व कुलकर्णी काा सासवड व देसपाडिये कर्यात मजकूर

---

लेखांक २८८

वडील रामोजी वाडकर हा चंदर-रायाची टोगाईने राहात होता याबदल त्यास तिथे चंदररायानी चिलखीस मारिला त्याउपरी त्याचा लेक कुमाजी वाडकर चदररायाचे धासतीकरिता परागदा होऊन गेला तो हि पळसोसी वा रोहिडखोरे येथे चंदररायाचे त्या-रीस सापडला मारिला त्याचा लेक मिकजी वाडकर आपला आजा हा मौजे नादगाऊ ता हिरडस मावळ येथे राहून नांदत होता तेथे एसजी वाडकर व रुद्रोजी वाडकर व निळोजी वाडकर पाटील मौजे मार व थान मावळा व मिका माहर इतके जाऊन मिकाजी वाडकराची समजावीस करून गावास आणून इनामाचे से ताचा टुकडा व वीस हात घरठाणा व वीसा टकियाचे सेत कुणवाषियाचे इतके आपले तकसीमेचे आपला आजा मिकजी वाडकर व जाउजी वाडकर आपला बाप व आपण ऐसे खात आलो असता एसजी वाडकर म्हणतो जे तुम्हास इनामाचे टुकडि-यास व घरठाणियास व कुणवाषियाचे सेतास निसबती नाही म्हणून खलेल केले आहे परतु आपण पाटीलाचा तकसीमदार माऊ सरा इनामसाचा टुकडा व वीस हात घरठाणा व षीसा रून याचे वडिल व वा नांदत होते याने इनामाचे सेताची तकसीम कधी नाही घर ठाणा मिराशीचा याच हि ऐसे गोत खरें करून दे रें न करवे व ठा णचा गुन्हेगार व गोताचे खोटे म्हणून ऐसी तकरीर लेहून दिल्ही १

टकेचे सेत ऐसे आपण खात आलो
ऐसे गोतमुखें खरे करून देईन खरे
न करवे तरी दिवाणचा गुन्हेगार
गोताचा खोटा म्हणोन तकरीर लेहून
दिली ... ... १

येणेप्रमाणे हरदो वादियाच्या तकरीरा समस्त गोत हजीरमज्यालसीस मनास आणून हरदो वादियांसि गोतानी विचारिले जे बापुजी वाडकराचा भोगवटा इनामतीचे सेतास व घरठाणेयास व सेतास किती वरशे जाहाला आहे त्यावरून एसजी वाडकराने सांगीतले जे बापुजी वाडकरास दाहा पाच वर्षे कुणबी हाणोन दिल्हे होते दाहा पाच वर्षे च खादले आहे याहून अधीक भोगवटा नाही ऐसे एसजी वाडकराने सांगीतले त्याउपरी बापोजी वाडकरास विचारिता बापुजी बोलिला जे तीनी पिढ्या आपण इनामतीचे सेत व घरठाणा वीस हात व वीसा टकेचे कुणबावियाचे सेत इतके आपले आजे यासी समजाऊन आणिले यावरी चाळीस पनास वर्षे सदरहूप्रा इनाम व घरठाणा व कुणबावियाचे सेत खात आहो हे खरे ऐसे दोघानी करीना सागितलियावरी समस्त गोतानी हरदो वादियास विचारिले जे बापुजी वाडकर इनामतीचे सेत व घरठाणा व कुणबावियाचे सेत खातो हे हमशाही गावगनाचे पाटीलास दखल आहे कीं नाही त्यावरून दोघे वादे बोलिले जे हमशाही पाचा सा गावीचे पाटील वाडकर ते हि भाऊ होते त्यास व मौजे मारीचे बलुतेयासी ठावके त्यावरून गोतानी हरदोजणास विचारिले कीं हमशाही गावीचे पाटील व मौजे मारीचे बलूतेपैकी जे गावी हाजीर असतील ते गोही देतील त्याचे गोहीस राजी आहा की नाही त्यावरून दोघे वादे सिवधडे पाटीलाचे व मौजे मारीचे बलूतेयाचे गोहीस रजावद होऊन राजीनामा लेहोन दिला जे सिवधडे पाटील व गावीचे बलुते जे शफतपूर्वक गोही सांगतील त्याप्रमाणे वर्तोन त्यास नामुकुर होऊन तरी दिवाणचे गुन्हेगार गोताचे खोटे ऐसा राजीनामा लेहोन दिल्हा त्यावरून रा तिमाजी यमाजी मुा न्यायाविशयानी रा अनाजी जनार्दन सुभेदार प्रांत वाई याकडे कागद लेहोन देऊन हरदो वादेयांस सुभेदाराकडे पाठविले जे श्री कृष्णातीरी हमशाही सिवधडे पाटील व मौजे मारीचे बलूते याचे गोहीस हरदो वादे राजी जाले आहेत तुह्मी माहालचे सुभेदार आहा

इमथाही पाटील व मेहते मिळऊन श्रीकृष्णातीरी शफतपूर्वक गोही विचारून ल्हीोन पाठवणे त्यावरून हरदो वादे सुभेदाराकडे गेले मोनिलेनी मौजे बोरगाऊ खुर्द ता जोरखोरे येथे

मेणेप्रमाणे गोत मिळऊन त्याचे माया श्री ची शफत घालून विचारिले जे सत्य काय ते सांगणे त्यावरून अवधियाचे मतें कमा माहर व रामा माहर व खेळा माहर व नागोजी घडसी मिरासीदार मौजे मारयांचे माथा श्रीची शफय घावली मानी गोही सांगीतली जे बापुजी वाडकर याचा आजा नांद गावी होवा तेयें एसजी पा व निळोजी पा वाडकर मौजे मार व भिक मायला व भिकनाक माहर मौजे मजकूर हरकीयानी समजाऊन भिक्षलीव आणून विसा टकेचे सेत व इनामाचा टुकडा व घरठाणा वीस हात हवके देऊन त्याची समजाविसी करून गावास आणिले त्या तागाईत बापुजी वाड कर याचा आजा व बाप व बापुजी वाडकर ऐसे स्वात आले आहेती परंतु यानी वकसीमदार ह्मणुन समजाविला की काय ह्मणुन समजाविला माहे आपणास कळलें नाही ह्मणोन गोही दिल्ही म्हणुन रा अनाजी जनार्दन सुभेदार प्रांत वाई याचा कागद थळ मजकुरी हाजीर मग्याळसीस गोताने वाचून मनाची आणिला कलम

१

बाळोजी वाडकर पाटील मौजे बोरगाउ बुा ता जोरखोरे हा बुढा पाटील वाडकराची अदी बुनियादी त्यास दखल आहे त्याचे गोहीस हरदो वादे राजी पहिले होऊन राजीनामेमध्ये बाळोजी वाडकर गोही देईल त्याप्रमाणे दोघानी वर्तावे ऐसे होते मा लम्या सुभेदारानी गोहीया मनास आणिल्या त्यामध्यें बाळोजी वाडकर पाटील मौजे बोरगाउ हा तेथे हजीर नव्हता याबदल त्यास थळ मजकुरी पेंठ पारामध्यें आणून श्री वर्धायानीचे देवळापुढें त्यास उभे करून नरककुंड खोदून वेताळीस त्याचे पूर्वजाची शफत व श्रीचा अगारा बेल माथा देऊन समस्त गोतानी हाजीर मग्याळसीस विचारिले त्यावरून शफतपूर्वक बाळोजी वाडकर पा मौजे बोरगाउ बुा याने सांगीतले जे बापुजी वाडकराना वडील रामोजी वाडकर ह्मणुन मौजे चिम्म लीव पाटील वकसीमदार होता तो चंदराउ आठलीस हाते यांशी ठोंगांही

वर्तत होता याबदल चंदररायानी स्वारी घालून त्यास जिवे मारिले त्याउपरी त्याचा लेक लुमाजी वाडकर गाव सोडून परागदा होऊन मौजे पलसोसी ता। रोहीडखोरे येथे जाऊन राहिला होता त्या गावावरी हि चंदररायाची स्वारी जाली होती तेथे लुमाजी वाडकर सापडला तो हि तेथे जिवे मारिला त्याउपरी त्याचा लेक भिकजी वाडकर हा धाकटा होता हा जाऊन मौजे नांदगाव ता। हीरडस मावळ येथे राहिला होता तेथे कितेक दिवस होता हे वर्तमान चिखलीकर वाडीकरास कळलियावरी एसजी वाडकर व रुद्राजी व निलोजी पा। वाडकर व भान मावला व भिका इतके जणानी जाऊन त्यास आण शफत देऊन त्यास विसा टकेचे सेत व इनामतीचा टुकडा तकसिमेचा व वीस हात घरठाणा ऐसा देऊन त्याची समजाविशी करून गावावर आणून टेविला त्या दिवसापासून इनामतीचा टुकडा व वीसा टकेचे सेत व वीस हात घरटाणा ऐसे आनभवीत आला चाळीस पनास वर्ष भोगवटा चालिला त्याउपरी कितेका वर्षानी बापुजी वाडकराचे वेलेस एसजी वाडकराने कथला केला जे तुज इनामतीचे सेत व घरटाणा व विसा टकेचे सेत देत नाही त्यावरून बापुजी वाडकर गाव सोडून मोगलाईत गेला त्याउपरी मुलूक वोस जाला आदीमध्ये एसाजी वाडकर व गोमाजी वाडकर व मालजी वाडकर व रुद्राजी वाडकर हे जाऊन राहिले तेथे मागती बापुजी वाडकराने बालोजी वाडकरास अवघिया भावबंदास एक ठाई करून प्रश्न केला ते वखती आष्टीमध्ये रुद्राजी वाडकर याचे घरी जेवण होते तेथे जेवयाचे वेलेस अवघियानी एसजी वाडकरास ह्मटले जे बापुजी वाडकराची समजावीश करिता बरे आहे तेव्हा तानाजी मालुश्रा पा। मौजे गोडवली व रायाजी पा। मौजे मालदपूर व कानोजी सिंदा पा। मौजे असेगाव व मौजे मारचे वाडकर भाऊ इतकियादेखत एसजी वाडकराने बापूजी वाडकरास इनामतीचा टुकडा व वीसा टकेचे सेत व वीस हात घरठाणा इतके देऊन आपण शफत देऊन त्यास हाती धरून समजाविले ते समई बापुजी वाडकर कागदपत्र मागत होता तेव्हां आपण बालोजी वाडकर बोरगावकर बोलिला जे जीत कागदपत्र आह्मी भाऊ आहो तुझे पूर्वापार इनामाचे सेत व वीसा टकियाचे सेत व घरठाणा तुज दिले तुझे तू खाऊन सुखरूप असणे यास कोणी कथला करावयास निसबत नाही ऐसे बोलोन समजाविशी केली त्याप्रमाणे गावास आलेवरी बापोजी वाडकराचे स्वाधीन इनाम टुकडा व बिसा टकेचे सेत व घरठाणा केला इतके आपणास दखल आहे ह्मणुन शफत देऊ गोही दिल्ही

सदरहूप्रमाणे गोही मनास आणुन थल मजकुरीचे गोतानी निवाडा केला जे बापुजी वाडकर जरी मिराना कुणबी असता तरी त्यासजी भाऊ कराने पहिले त्याचे आज्यास इनामाची तकसीम सेत कां देता घरठाणा कां देता दुसरे दाहा पाच वर्षे च खात होता म्हणत होता त्यास हमशाही पाटीलाची व गावीचे वलूत्याची गोही तीन पिढिया चालीस पनास वर्ष भोगवटा चालिला आहे ऐसी गोही गुदरली व बापुजी वाडकर म्हणजे रामोजी वाडकर पाटील तकसीमदार चिखलीस होता त्यास व त्याचा लेक लुमाजी वाडकर त्यास चदररायानीं जिवे मारिले त्याबदल परागदा होउन गेला होता लुमाजी वाडकराचा नातु बापुजी वाडकर ऐसे म्हाळोजी वाडकर पा। मौजे बोरगाव ह्या याने शफत क्रिया देऊन साक्षी दिल्ही व मौजे मज-कूरचे वलूतेयानी साक्षी दिली ऐसे दोनी गोही खरी गुदरली ऐसे असता एसजी वाडकर बापुजी वाडकरास कुणबी मिराम म्हणतो हे गैर—माकुल बापुजी वाडकर म्हणजे चिखलीकर पाटील यांचा भाऊ खरा पहिलेपासून इनामधीचे सेताचे तकसिमेचा टुकडा व वीस टकेचे कुणबावियाचे सेत व घरठाणा बीस हात जे खात आला आहे त्याप्रमाणे त्याचे त्यास देणे ऐस गोतानी एसजी वाडकरास वरहक निवाडून सांगीतले त्यावरून एसजी वाडकर हा हि समजोन कबूल आत्मसतोषे कले बापुजी वाडकर सादास (ख)रा जाहाला एसजी वाडकर खोटा जाला ऐसा निवाडा थल मजकूरचे गोतानी वर हक रून प्रमाणे महजर करून दिल्हा हा लिहिला महजर सही

---

लेखांक २८९

श्रीनरहरीप्रसन

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दिनकर रावजी भाऊ स्वामीचे सेवेसी

पोष्य सदाशिव नायक सरदेसाइ कृतानेक साष्टांग नमस्कार विनति येथील कुशल ता। छ ५ जिल्काद पर्यंत श्री कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष आपणाकडून पत्र यऊन कुशलार्थ कलत नाही तरी ऐसें नसावें निरंतर पत्रीं संतोषवीत असावें यानंतर कसबा संगमस्वर येथें आमचा वडि लोपार्जित वाडा आहे त्याजवरून घरपल होत व जळालें त्यासमंधें कष्ट हाक

डी काम वाड्यावरी करून शाकारणी नहुती त्यास गुदस्तां एक सोपा बांधा-वयाचा उद्योग आरंभिला तेव्हां हा राजवाडा ऐसें सरकारांत सम-जाविलें त्यावरून आर्क्षी सेल ताडेकर याजबरोबर पत्रें देऊन पुणेयासि तुह्माकडे व राजश्री बाबूरावजी व वेदमूर्ति राजश्री बाळंभट इर्गे पुणेयासि गेले ते समई आह्मी वाड्याचा मजकूर श्रीमताच्या कानावरि घालून घर बाधावयाविशीं आज्ञा घेऊन पाठवावी ऐसें सागीतलें होते त्यावरून त्याणी वेदमूर्ती राजश्री सदाशिवभटजी नानल यांजकडून श्रीमताचे काना-वरी घालून राजश्री माहादाजीपत काले निसबत सरसुभा याणी परवानगी सागीतली जे हजार रुपयांचा कतबा सरदेसाईयाणी आपला वाडा ह्मणोन त्याजपासून घ्यावा आणि चौकसी करून वाडा बांधावयासी परवानगी त्यास द्यावी याप्रों जाली आहे ह्मणोन आपले लिहिले आले नतर राजश्री परशुरामपतदादा याणी आह्मास बलाऊन नेऊन हजार रुपयाचा कतबा मागितला तेव्हा आमचा वादी कोण ह्मणोन त्यास पुशिलें तेव्हा त्याणी उतर केले कीं सरकारांतून चौकसी करावी ह्मणोन आज्ञा जाली आहे त्यावरून चौकसी करितो तेव्हा आमचा वाडा वतनी श्रीमंत कैलासवासी सभाजी माहाराज किले रायगडाहून मोगलाचे अडचणी-मुलें कनजीचे बुध्धीने जरोर निघोन सगमेस्वरीं आलें ते उन्हाळां जमात वाड्यानजीक होते पर्जन्यकाल आला चहूकडे धामधूम ऐसी सधी पडिली त्यात आमचा वाडा मोठा पाहून आमचे वडीलयांजवल जागा मागोन वाड्यात येऊन अडीच ( महिने ) पर्यंत राहिले पुढे शेख निज्याम सुभा मोगलाकडून येऊन त्याणे हस्तगत करून नेलें ते समई वाडा आमचा जालि-ला व गांवातील देवलें फोडिली व देव बाटविले याप्रों माहार्णव जाहाले मोगलानें प्रात काबीज केला कसब्यांत गढी बांधिली प्रातास कौल दिल्हा तेव्हा आमचे वडील रगोबा नायक याणी वाडा बांधोन वस्ती केली वीस पंचवीस वर्षे नादले त्याजवर त्याचा काळ जाहाला त्याचे पुत्र पाच वडील केशव नायक व गणोबा नायक व विसोबा नायक दादोबा नायक व अतोबा नायक ऐसे नांदत असता नारायणराव घोरपडे कानोजी आगरे याजकडे सुव-र्णदुर्गास हबशीयाणे शह दिल्हा तो उठवावा ह्मणोन कैलासवासी अमात्यपत याणी पाठविले होते तेथील शह उठऊन माघारे आले तें समई सावर्डे माहालापासून लुटीत आले कसबा सगमेश्वर येथे वीस दिवस तळ दिल्हा

विचार करून आज्ञा होत नाही वे हा कालमहिमा व आपला आभकाळ असो आमचे भावे तुही आहां माऊ तुमचा व मासा स्नेह त्याचें साधक हें च आहे हाली दोन जोसी सभ्याची यातमी सांगावयाकरितां गेले आहेत तरी परशुरामपंत दादाचा ठेस च भीमवांस दासवाया श्रीमंत कैलासवासी बाजी रावसाहेब सुपेयाहून सासवडीं देशमुखाचे वाड्यांत राहिले तेथें पुरंदऱ्ये याणी श्रीमताचे घरचे उपाध्यपणाविशीं खटला आरंभिला याजमुळें पुणेयासि आले ते देशमुखयांचे वाड्यात येऊन राहिले श्रीमत नानासाहेब यांचा जन्म देशमूख याच्या वाड्यांत जाहाला हें वर्तमान तुह्मास दखल असावें बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंति

---

लेखांक २९०

श्री

मौजे सागवी ता सांडस प्रा पुणे येथील चेरी तांये यस पौ तिरेका सिघे ३० पेशजी चाकणचे अमदानीस चाळत होती अमळ लोहेखान ते वेळेस कुमाजी बिन दाजी पाटील केले मोकदम नहावीस होता गावात करभारी लक्ष्माजी बिन होनाजी कुमाजी मगर याचा चुलता व पिलाजी बिन सावजी पावळे चौगुला व गोपाळ कृष्ण गुमास्ते कुलकरणी त्या अमदानीस मालजी बिन सावजी पावळ याजकडे चेरीची सरकती होती चेरीचा माल पीक अमदानी देशमुखाचे घरी आणोन देत होता खंडणी करावयासी पाटील कुलकरणी चाकणास गेले खंडणी होऊन जामीन घाफळी होऊ लागली ते समई लक्ष्माजी व पिलाजी पिंपलेकर पाटील यासी जामीन जामीन जाहाले की हे गेले पलाले तरी दीडमे हानासी निघा आपण करोन देऊ त्यासी तो गाव पलाला तेव्हा जामीनास तगादा केला स्वारासी बरदास्त करोन रात्रीस पळोन गेले नंतर स्वारानी गावांस घरकडाचे मुख्यमाणसास छेडाछेड केली त्यासमई चेरीकराने स्वार समागमे घेऊन मोकदम पाटील नाहावीस होता त्यासी दाखविले तेथोन स्वारानी पाटीलास चाकणस घेऊन जाऊन पायात बेडी घातली पिंपलेकर पाटील आणोन हाजीर करावा नाही तर दीडमे होनासी निघा करावी तेव्हा नाहावकर सितोळे यानी मालोजी नरसिंगराव बाबा देशमुख मानपासी येऊन विनंति केली की तुमचा पाटील केवळ

पडला आहे यासी सुटका होय तो अर्थ केला पाहिजे त्याजवर देशमुखानी विचार करोन पाटलाची वायको व पुत्र उभयतास बरोबर सतु गुरव व धावनाक माहार समागमे देऊन चाकणकर देशमुखास पत्र दिली जे उभयतास येऊन पाटलास सोडून द्यावे ह्मणजे ऐवजाची तरतूद करील त्याजवर पाटलास सोडून दिले घरास येऊन गावकरी बोलाऊन सर्वत्रानी मिलोन रुये सभर दिले आणि पाटलान आपले घरचे घोड व वस्तभाव विकोन ऐवजाची भरती केली जामीनकी उगवोन सिरपाव घेऊन वायको व पुत्र याजला घेऊन गावास आला मग बरवाजी पावला चौगुला रोनगावकीचा कारभार करू लागले ते समई पाटील माराने मालोजी बावा देशमुख याजपासी सागीतले की तुमचे शेसीकरान स्वार आणोन दाखऊन दिले ह्मणोन सागीतले नतर त्याजकडोन शेरी काह्याडली जाखोजी पावला याजकडे सेरीचे काम सागीतले त्याजवर जाखोजीने काही दिवस शेरी व पुढे चाकणेकडोन गाव निघाला काल बहुत कठीण पडला गाव उज्याड जाहाला त्याजवर अवरगजेब बाछा मुलकात आले त्याचा कौल घेतला परतु गावात वस्ती जाहाली नाही पुढे शाहूमाहाराजाचे अमदानीस दमाजी थोरात यानी आपले सिलेदारास गाव मोकासे दिले त्या वेलस सागवी गाव सितोजी सितोले यासी मोकासा करून दिला त्यानी तुकोजी पाटील याचा पुत्र बाकोजी पाटील खानदेशातून धरून आणिले आणि थोराताचा कौल देऊन गावची वस्ती केली तेव्हा आपली सेरी नाहावीकर होनाजी सितोले यासी लाविली होती त्याने सात आठ वरसे वयवाट केली फिरोन गाव उज्याड पडला मग पुढे बालाजीपत नाना याचे कौलाने मागती वस्ती जाहाली मग बाकोजी पाटील आपले बापास घेऊन तलेगावास आला पुण्यास येऊन देशमुख देशपांडियासि भेटून वर्तमान सागितले की मी एकला आहे भाऊबंद कुलडम असामी कोणी नाही यासी काय ते आज्ञा करावी त्यासी सागीतल जे आसपास भाऊबंद व कुणबी आसामी असेल त्यासी आणोन वस्ती करावी त्याजवर पाटलानी उतर केले की पोटास काय खावे त्यासी उतर केले की दोन पायली दाणे देतो घेऊन चहूकडे प्रयत्न करोन गावची वस्ती करावी पाटलाने जाऊन दोन चार भाऊ ठिकाणी लाऊन लखमाजी बिन देवजी कलो बरोबर घेऊन पुण्यास आला आणि कौल मागू लागला भेटी

ऐवाज यासी अनकूल नाही यापोजी श्रीपत सुभेदार याजपुढे पानसुपारी ठेऊन कौल घेतला त्यावर योडीसी वस्ती जाहाली खिवार पडला च होता पांच सात षेत माश्र लागली होती पुढे गावकी न चाले आणि खिवार हि न लागे ह्मणोन खिवोजी बाबा खितोले भाऊ करोन लावणी केली आणि वस्ती हि जाहाली पुढे पाचा साता वरसा पुण्यास येऊन श्रीमत बाजीराव साहेबाच कानावर घालोन सुरत महाजर अभयपत्र व देशमुख देशपांडे सरकार कार कुण हवालदार मजमदार गावास घेऊन गेले भोवर गावचे पाटील व बारा बलुते जमा करोन महजर करू लागले कागद सिध झालाले ते समई देशमुख देशपांडे बोलले की आमची सेरी व इनाम दाखऊन द्यावी ह्मणजे लावणी करू मग बाकोजी पाटील व गोदाजी पाटील खितोले बोलले की कागदपत्र तयार करावे नंतर सेरी व इनाम दाखऊ मग भोवर गावचे पाटील चौगुले व गावचे बारा बलुते याची गोही व देशमुख व देशपांडे याची दस्तक जाहाली व हावलदाराचा सिका जाहला तेसमई खासा देशमुख संभेराव व मातोश्री लाडूबाई व कारभारी बडफले नाना व कल्याणपंत व निळो विठल देशपांडे होते सिका करते समई देशमुख गोदाजी बावा सितोले यासी बोलले की नाहावीच्या कजियाबदल लोकासी घोडी वाटली ते समई आह्मास काही दिले नाही तर त्या अवलादीचे एक घोड आह्मास द्यावे ह्मणजे सिका करू तेव्हा सितोले मार बोलला की असी घोडी कोणाकोणास देऊ हे गोस्टी आह्मास पुर्वत नाही तेव्हा मातुश्रीने देशमुखाचे हातचा सिका घेऊन पुण्यास आले मागाहून पाटील मार पुण्यास येऊन श्रीमताची परवाणगी घेऊन जानोजी पाटील दमडेर तळेगावकर यानी मधेस्ती करोन मातोश्रीस समजाऊन महजरावर सिका केला

# व्यक्तींची सूची

( नावापुढील अंक लेखांकांचे समजावे. )

## अ

## आ



## उ

## ख



## ग

## त

## न

## भ

## ल

## ह

## इ



# स्थळांची सूची

## अ



## आ

## इ



## उ



## ए, ऐ



## औ



## क

## श



## स